प्रकाशक
देशमुख आणि कंपनी
१९१ शनवार, पुणें २







मुखपृष्ठावरील चित्र
दीनानाथ दलाल



प्रथम आवृत्ती
२८ सप्टेंबर १९५२



मुद्रक
गं. शं. दाते
कलागृह प्रेस,
६६६ सदाशिव, पुणें





देशमुख आणि कंपनीनें

प्रकाशित केलेली पुस्तकें

वि. वा. शिरवाडकर

१ समीधा

‘ गद्यकाव्य ’

२ दुसरा पेशवा

‘ नाटक ’

३ जान्हवी

‘ कादंबरी ’



# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

‘ किनारा ’ हा कुसुमाग्रजांचा दुसरा काव्यसंग्रह. तो ‘ विशाखा ’ नंतर दहा वर्षांनीं कवि सादर करीत आहेत याचें अनेकांना आश्चर्य वाटेल. ‘ विशाखे’नें कुसुमाग्रजांना अमाप लोकप्रियता मिळवून दिली. तरुण पिढींतले अग्रेसर कवि म्हणून ते अखिल महाराष्ट्राला प्रिय झाले. असें असूनहि रसिकांची पुनर्भेट घेण्याच्या बाबतींत ते रेंगाळतच राहिले.

पराक्रमी पुरुषाच्या वृत्तींत कळत न कळत एक प्रकारचा उन्माद उत्पन्न होत असतो. नवनवे विजय संपादन करण्याला तो केवळ उत्सुकच नव्हे तर उतावळा होतो. जिंकायला देश उरला नाहीं म्हणून अश्रू ढाळणाऱ्या शिकंदराची कथा माणसाच्या या अंध महत्त्वाकांक्षेच्या पोटींच जन्माला आली आहे. क्रिकेटमध्यें चौफेर टोले लगावून शतकाकडे वेगानें धांव घेणाऱ्या खेळाडूचा त्याचे प्रतिस्पर्धी बळी घेतात तो मनुष्याच्या मनोवृत्तींतील याच वैगुण्याचा फायदा घेऊन.

संयम हा वस्तुतः पराक्रमाचा मित्र आहे. पण तो बहुधा त्याला आपला शत्रु वाटतो. कलावंतांतहि या नियमाला अपवाद असलेल्या व्यक्ती क्वचित्च आढळतात. प्रतिभा स्वभावतः सीतेसारखी सती आहे, पतिव्रता आहे, तपस्विनी आहे. पण कांहीं झालें तरी तिचें मन हें स्त्रीमन आहे. कीर्तीच्या कांचनमृगाचा तिला मोह पडतोच पडतो. या मोहामुळेंच अनेक कलावंत आपल्या आश्रमांचें कारखान्यांत रूपांतर करतात, प्रशांत तपस्येऐवजीं कृत्रिम धडपडीला महत्त्व देतात, आणि चिरंतनाच्या चिंतनाऐवजीं क्षणिकाच्या उपासनेंत दंग होऊन जातात. ऐन तिशींत विलक्षण लोकप्रियता लाभूनहि कवि कुसुमाग्रज आपल्या संथ आणि अंतर्मुख साधनेपासून विचलित झाले नाहींत ही गोष्ट मला मोठी महत्त्वाची वाटते.

कॅथेरिन ॲना पोर्टर या अमेरिकन कथालेखिकेनें 'Flowering judas' या आपल्या कथासंग्रहाला लिहिलेल्या छोटया प्रस्तावनेची मला या संदर्भांत आठवण होते. तिच्या कथा मोठया नाजुक आणि कलात्मक आहेत. 'The racked looking-glass' या अप्रतिम कथेंत तिच्या कलेची सूक्ष्मता आणि सुंदरता जशी दिसून येते तशी अंतर्भेदी दृष्टीनें जीवन पाहण्याची आणि त्यांतले सारे रंग हलक्या हातानें टिपून घेण्याची तिची शक्तिहि प्रकर्षानें प्रतीत होते. पण असें सामर्थ्य असलेल्या या लेखिकेनें एका दशकाच्या अवधींत अवघ्या दहा-बारा गोष्टी लिहिल्या आहेत. विपुलता म्हणजे गुणवत्ता नव्हे, 'दिसामाजि कांहींतरी तें लिहावें' हा दंडक अक्षर सुधारण्याच्या दृष्टीनें फार मोलाचा असला तरी जातिवंत लेखकाच्या गुणांना तो मारक होण्याचाच संभव आहे, या गोष्टीची जाणीव तीव्रतेनें झाली पाहिजे अशीच आपल्या देशांतल्या सर्व कलांची आज-कालची स्थिति आहे. वर्तमानकाळ मोठा विचित्र आहे. जीवनाच्या प्रत्येक अंगाचा–मनुष्याच्या अंतरंगांतल्या अगदीं कोमल भावनांचा सुद्धां–तो बाजार मांडीत आहे. अशावेळीं काल जो धर्म भासत होता तो आज धंदा झालेला दिसला तर त्यांत नवल कसलें ?

या परिस्थितींत नवल वाटावें तें आपल्या व्रतापासून न ढळणारांचें ! कला ही जागृत आत्म्याची भाषा आहे, त्याच्या विविध जाणिवांतून आणि उत्कट प्रक्षोभांतूनच ती निर्माण झाली पाहिजे, हा दंडक कसोशीनें पाळणारांचें ! 'किनारा' वाचतांना कुसुमाग्रजांतल्या कलावंताचा हा प्रामाणिकपणा वाचकांना पदोपदीं प्रतीत होईल अशी माझी खात्री आहे.

दहा वर्षांत एका प्रतिभासंपन्न कवीनें इतकी थोडी कविता लिहावी याचेंहि अनेकांना आश्चर्य वाटेल. कांहीं प्रामाणिक कलावंत विचित्र परिस्थितीमुळें मुके बनतात. नाहीं असें नाहीं. त्यांनीं प्रिय मानलेलीं आणि भक्तिभावानें पूजिलेलीं कलेचीं व जीवनाचीं मूल्यें सभोंवतालीं उध्वस्त होत असलेलीं पाहून त्यांची प्रतिभा गोंधळून जाते. भीषण अपघातांत सांपडलेल्या अपत्याचा मृत्यु पाहून एखाद्या मातेची वाचा जावी तशी त्यांची स्थिति होते. वर उल्लेखिलेल्या प्रस्ता-वनेंत कॅथेरिन पोर्टरनें आपला हा अनुभव मोठया मार्मिकपणानें सूचित केला आहे. सुदैवानें कुसुमाग्रजांची मनःस्थिति तशी झालेली नाहीं. गेल्या दशकांत त्यांनीं कविता थोडी लिहिली याचें कारण त्यांच्या प्रतिभेला आलेला विविध

प्रकारचा बहर हेंच असावें ! नाटक, कादंबरी, लघुकथा व लघुनिबंध या विविध क्षेत्रांत त्यांनीं गेल्या दहा वर्षांत स्वच्छंद संचार केला आहे. त्यांच्या कल्पकतेचीं आणि भावनाविलासाचीं नाजुक पावलें या सर्व क्षेत्रांत मोठया रेखीव रीतीनें उमटलीं आहेत.

'किनारा' मधल्या कवितांची ही पार्श्वभूमि लक्षांत घेतली म्हणजे त्यांत दिसून येणारें कवि-प्रतिभेचें सामर्थ्य व तिच्या मर्यादा या दोन्हीं गोष्टीवर चांगला प्रकाश पडतो. कुसुमाग्रजांच्या पहिल्या काव्यसंग्रहांत प्रतिबिंबित झालेलें कल्पक आणि तेजस्वी कविमन या कवितांतहि विविध रीतींनीं आविष्कृत झालें आहे. 'हें व्यर्थ न हो बलिदान' ही कविता वाचतांना 'गर्जा जयजयकार'ची आठवण कुणाला होणार नाहीं ? 'जा जरा पूर्वेकडे' ही कविता लिहिणारा कविच 'फेरीवाला' ही एकाच वेळीं मन उदास आणि प्रक्षुब्ध करून सोडणारी कविता लिहूं शकेल असें कोण म्हणणार नाहीं ? 'मातीचा पुत्र' आणि 'कोलंबसाचें गर्वगीत' यांची जातकुळी एक आहे हें सांगायला एखादा पंडितच कशाला हवा ? या संग्रहांतल्या जवळ जवळ निम्म्या कविता अशा आहेत कीं निनांवी छापल्या गेल्या असत्या तरी त्या कुसुमाग्रजांच्याच आहेत असें रसिकांना वाटलें असतें. 'आवाहन', 'उत्तररात्रीं', 'शृंखला', 'नव्हतें माहित', 'ताजमहाल', 'अबोध', 'उषाच गमली', 'मातीचा पुत्र', 'जीर्ण देवळापुढें', 'सुदामा', 'अज्ञात', 'निरोप', 'फेरीवाला', 'कायदा', 'एकच गाणें', 'वेगवती', 'एक स्वप्न', 'साक्षात् ईश्वर', 'मेघांची सेना,' 'वैष्णव', आणि 'बलिदान' या त्या कविता होत. कांहीं माणसें आपण नुसत्या आवाजावरून ओळखतों, कांहीं चेहऱ्यावरून ओळखतों, कांहींची ओळख त्यांच्या अगदीं लहानसान अशा कृतींतूनहि पटते. या कवितांच्या बाबतींतहि तसेंच म्हणतां येईल. डौलदार शैली, भव्य कल्पना, ज्वलंत भावना, मानवतेविषयींच्या प्रेमामुळें किंवा अन्यायाच्या चिडीमुळें प्रक्षुब्ध झालेल्या कविमनाचा आविष्कार यांपैकीं कांहीं ना कांहीं या कवितांत आपल्याला चटकन् आकृष्ट करतें आणि रातराणीच्या सुगंधाप्रमाणें आपल्या अंतर्मनांत रेंगाळत असणाऱ्या अनेक चिरपरिचित ओळींचा गोडवा जागृत होऊन आपण म्हणतों, 'ही कुसुमाग्रजांचीच कविता असली पाहिजे.'

● ● ●

१९२५ ते १९३५ हें दशक काव्यप्रांतांत रविकिरणमंडळानें गाजविलें.

यशवंत व माधव ज्यूलियन यांचीं अनेक सरस कवनें याच काळांत निर्माण झालीं. या कवनांचे संस्कार त्यांच्या मागून येणाऱ्या कवींवर होणें अपरिहार्य होतें. कुसुमाग्रज व बोरकर यांच्यावर ते तसे झालेहि आहेत. मात्र त्या संस्कारांचा संबंध त्यांच्या काव्याच्या अंतरंगापेक्षां बाह्यांगाशींच अधिक आहे. अंतरंगाच्या दृष्टीनें पाहिलें तर कुसुमाग्रज केशवसुतांचे व बोरकर तांब्यांचे वारस आहेत. १९३५ नंतरच्या मराठी कवितेंत प्रसन्नता व प्रभाविता यांचा जो मनोहर संगम अधिक मोठया प्रमाणांत दिसूं लागला त्याचें श्रेय या दोन कवींच्या प्रतिभेलाच आहे. कांत, पोवळे, वसंत बापट, पाडगांवकर वगैरेंची कविता पाहिली कीं ही गोष्ट चटकन् लक्षांत येते.

१९३५ नंतरच्या दशकांत कुसुमाग्रज व बोरकर यांची बरीचशी चांगली कविता निर्माण झाली. हे दोघे कवी नकळत परस्परांना पूरक झाले असले तरी त्यांच्या काव्यप्रकृतींतलें अंतर चटकन् डोळयांत भरण्याजोगें आहे. दोघेहि कल्पक, पण कुसुमाग्रजांची कल्पकता भव्यतेंत रमणारी तर बोरकरांची कोमलतेंत रंगून जाणारी. ग्रीष्माच्या दाहकतेचें वर्णन करतांना कुसुमाग्रज सहज लिहून जातील—

नाचवीत तळहातीं ज्वाळा
वणव्यांच्या कमरेस मेखला
बांधुनिया हा ग्रीष्म कृतांतापरी करी संचार

‘उत्तररात्रीं’ किंवा ‘ताजमहाल’ यासारखी या संग्रहांतील एकच कविता वाचली तरी त्यांचा हा विशेष मन आकृष्ट केल्यावांचून राहात नाहीं. मध्यरात्रीं चराचर सृष्टीवर पसरलेल्या निःशब्द शांततेचें वर्णन ते असें करतात—

जग विराट पक्षापरी मिटोनी पंख
कुहरांत निशेच्या पडलें श्रांत निवांत

दशदिशांत भरून राहिलेला काळोख पाहून माणसाच्या मनावर जें अनामिक विषण्णतेचें पटल येतें त्याचें हें चित्रण पहा—

त्या गहन अभावावरी तरंगत तारे
जणुं कबरीवरली कुसुमांची बरसात

मध्यरात्रींच्या त्या काळोखांत रस्त्यावरून चिटपांखरूं देखील फिरकत नाहीं हें त्यांची कल्पकता किती नावीन्यपूर्ण रीतीनें सूचित करते—

ती सुवर्णयात्रा खंडित घडिभर झाली
बाजारपथांच्या झाल्या रिक्त पखाली

चित्रणांत दिसून येणारें कवीच्या कल्पकतेचें हें प्रभावी वैशिष्ट्य काव्य-विषयांत व त्यांतून सूचित होणाऱ्या आशयांतहि अनुभवाला येतें. ' विराट वड', ' अज्ञात ', ' फेरीवाला', ' निरोप ', ' मेघांची सेना ', ' साक्षात् ईश्वर ', ' आकाशित लहरी ' या कवितांचे विषय किती विविध आहेत. पण कवीच्या कल्पनेनें ते सारख्याच कौशल्यानें फुलविले आहेत. ' विराट वड ' वाचून गडकऱ्यांच्या ' प्रेम आणि मरण ' या कवितेची अभावितपणें अनेकांना आठवण होईल. पण या कवितेंतून सूचित होणारा ध्वनि जितका वेगळा तितकाच परि-णामकारक आहे. जरेनें जर्जर झालेला, जगाकडून उपेक्षिलेला, जीवितांत आपलें आतां कांहीं कार्य उरलें नाहीं या जाणिवेनें सुन्न बनलेला आणि मृत्यूच्या पावलांची चाहूल ऐकायला उत्सुक झालेला एक जीर्णशीर्ण जीव— अपत्यांच्या कृतघ्नतेनें वैतागलेला आणि वेडापिसा होऊन थंडीच्या कडाक्यांत रानोमाळ भटकत सुटलेला वनस्पतिसृष्टींतला किंग लियरच आपल्यापुढें उभा आहे असा ही कविता वाचतांना मला भास झाला.

जीवनांतलें एक विचित्र कटु सत्य ' विराट वडांत ' सौंदर्याचा साज चढवून कवीनें चित्रित केलें आहे ' आकाशित लहरीं'त अशीच एक नवी मधुर अनुभूति त्यानें नाजुक कलमानें सजीव केली आहे. यंत्रयुगानें जीवनांतील काव्य कमी होईल कीं काय अशी शंका अनेकांना वारंवार येते. ' आकाशित लहरी ' हें त्या शंकेला कवीनें दिलेलें उत्तम उत्तर आहे. मानवाच्या बुद्धीनें लावलेला प्रत्येक नवा शोध जीवन विशाल आणि समृद्ध करतो. ती विशालता कविमनाला आवाहन केल्या-शिवाय कशी राहील ? प्राचीन काळच्या आकाशवाणीइतकाच आजची आकाश-वाणी हाहि एक प्रकारचा चमत्कार आहे. हातभर लांब आणि हातभर रुंद अशा लांकडी खोक्यांतून ही आकाशवाणी प्रगट होत असली तरी ती पंचखंडांतलीं सौंदर्यें तुमच्याआमच्या पर्णकुटिकांत मुक्त हस्तानें उधळत असते. शकुंतला सासरीं जायला निघाली तेव्हां अरण्यांतल्या वृक्षवेलींनीं तिला सुंदर वसनें आणि प्रसाधनें दिलीं असें आपण वाचतों. विसाव्या शतकांतला आकाशवाणीचा श्रोता त्या शकुंतलेइतकाच भाग्यवान आहे. म्हणूनच कुसुमाग्रज मानवी जीवनांतल्या या नव्या सुखकारक चमत्काराचें नाजुक कलमानें असें वर्णन करतात—

आकाशित लहरी
आल्या धांवत माझ्या घरीं
अधरिं कुणाच्या
कोकिळकूजन
कुणी वाहती
ज्ञानाचें धन
परि अवघ्यांची
एक मनीषा
नक्षत्रांच्या
निळ्या पथांतुन
व्योमनदीच्या
जलांत न्हाउन
चंद्रकरांना
वाट विचारित
करावयाला
बोधन रंजन
यावें माझ्या घरीं
आल्या आकाशित लहरी

● ● ●

'आकाशित लहरी' या कवितेंत प्रतिबिंबित झालेली कवीची सौंदर्यशोधक दृष्टि त्याच्या प्रेमगीतांत विविध स्वरूपांनीं प्रगट झालेली दिसते.

महाभारतांतल्या उषा-अनिरुद्धांच्या कथेइतक्या कोमल काव्यपूर्ण प्रेमकथा जगाच्या वाङ्मयांत फार थोड्या असतील. या कथेचा आत्माच मोठा कल्पनारम्य आहे. तिची नायिका उषा वल्लभाचें पहिलें दर्शन घेते तेंच मुळीं स्वप्नांत. ती पुलकित होऊन डोळे उघडते. वायुलहरींवरून तरंगत जाणाऱ्या सुगंधाप्रमाणें तें मधुर स्वप्न कुठें गेलें हें क्षणमात्र तिला कळत नाहीं ! दुसऱ्याच क्षणीं तें आपल्या

गात्रागात्रांत हंसत आहे याची तिला जाणीव होते. अनिरुद्धाच्या दर्शनाकरतां ती व्याकुळ होऊन जाते. पण स्वप्नांत पाहिलेल्या प्रियकराला प्रणयिनीनें कुठें शोधा-यचें आणि कसें ? सुदैवानें उषेची सखी चित्रलेखा सिद्धहस्त चित्रकार असते. सर्व प्रसिद्ध आणि सुंदर पुरुषांच्या आकृती ती भराभर रेखाटूं लागते. 'हा नव्हे,' 'हा नव्हे' असें उषेनें म्हणावें आणि चित्रलेखेनें दुसऱ्या पुरुषाची आकृति काढावी असें अनेकदां घडतें. पण चित्रलेखा कंटाळत नाहीं. शेवटीं ती एक आकृति काढते, 'हा नव्हे' हे ठराविक शब्द कानांवर पडणार अशा कल्पनेनें त्या उद्गारांची वाट पाहते. पण उषा कांहींच बोलत नाहीं असें पाहून ती वळून पाहते आणि चकित होते. उषा लज्जित होऊन चित्रलेखेनें रेखाटलेल्या आकृतीकडे पाहण्यांत दंग होऊन गेलेली असते.

नलदमयंती-आख्यानांत रंगून गेलेल्या रघुनाथ पंडितांना किंवा शकुंतलेची प्रेमकथा सुरस रीतीनें सांगणाऱ्या मुक्तेश्वरांना या कथेचें आकर्षण कां वाटलें नाहीं हा विचार अनेकदां माझ्या मनांत येतो. याचें कारण कांहीं असो, कुसुमाग्रजांनीं तो हाताळला हें फार चांगलें झालें. मात्र पृथ्वीवृत्तांत रचलेल्या या कवितेंत कवीच्या शैलीचा डौलदारपणा प्रतीत होत असला तरी जातिवृत्तांतून आढळून येणारें तिचें प्रवाहित्व इथें आढळून येत नाहीं. नेहमीं पांचवारी पातळ नेसणाऱ्या तरुणीनें चुकून नऊवारी लुगडें नेसावें आणि तें तिला शोभून दिसत असलें तरी तिचें तिलाच अवघडल्यासारखें व्हावें तसा भास ही कविता वाचतांना होतो. या भासामुळें मनांत येणारी एक शंका सांगितल्यावांचून राहवत नाहीं. मुक्तछंदापर्यंत पोंचलेल्या आधुनिक कवीला सर्व जुन्या वृत्तांत रचना करतां यावी अशी वेडी अपेक्षा यापुढें कुणीच करणार नाहीं. साधुदासासारख्या मागच्या पिढींतल्या पंडित-कवींच्या परंपरेंतील कवींनीं तशा प्रकारचें वृत्तप्रभुत्व प्रगट करावें हें स्वाभाविकच होतें. भावगीतांची रचना रसानुकूल जातींत व्हावी यांतहि कांहीं नवल नाहीं. पण हें सर्व मान्य केलें तरी कांहीं जुनीं वृत्तें विशिष्ट प्रकारच्या रचनेला व रसाविष्काराला पोषक असतात व त्यांच्यावर आधुनिक कवीचें प्रभुत्व असणें आवश्यक आहे ही गोष्ट दुर्लक्ष करण्या-जोगी नाहीं. रविकिरणमंडळाचा काळ मुख्यतः गेय कवितेचाच होता. पण त्यांत वृत्तरचनेची सध्यांइतकी आबाळ कधींच झाली नाहीं. सुनीताला निरनिराळ्या वृत्तांचे व जातींचे पोशाख अनेक कवींनीं चढवून पाहिले. पण त्याचें सौंदर्य

शार्दूलविक्रीडितांतच उठून दिसतें. सुनीत हा रचनाप्रकार कवींच्या प्रतिभेला सदैव आवाहन देईल असाच आहे. नवकाव्याचे नानाविध प्रयोग जिथें हिरीरीनें केले जात आहेत अशा इंग्रजी वाङ्मयांत अद्यापिहि सुनीताचा मोठ्या आवडीनें आश्रय केला जातो हें आपण विसरतां कामा नये. असें असतांना आपल्यांतले १९३५--४० नंतरचे कवि वृत्तरचनेविषयीं इतके उदासीन कां होत आहेत ?

'उषा-स्वप्न' ही जशी पौराणिक प्रेमाची मुग्धमधुर कहाणी तशी 'ताज-महाल' ही ऐतिहासिक प्रेमाची करुणरम्य कथा. कुसुमाग्रजांचें मन तिनें वेधून घ्यावें यांत आश्चर्य नाहीं. ताजमहालाचें वर्णन करतांना त्यांनीं जो कल्पनाविलास प्रगट केला आहे तो अगदीं बाणाच्या अच्छोदवर्णनाची आठवण करून देतो. मात्र या कवितेच्या शेवटच्या तीन कडव्यांत या वर्णनाला त्यांनीं जी कलाटणी दिली आहे तिच्यामुळें हें सारें सौंदर्य एखाद्या भग्नमूर्तीसारखें वाटतें. ते म्हणतात—

कीं असत्य केवळ प्रणयाचें प्राचीन
खोटीच देवता, मंदिर मात्र महान
वर उदात्ततेचे हे स्वर्गीय मनोरे
दडलेली खालीं देहलालसा हीन
कामांध शहाचे सजवायास पलंग
अपराध एकला ज्यांचा स्त्रीत्व अपंग
ओढल्या किती त्या रमणी राणिवशांत
तो असे अनात्मा, नाहीं मदन अनंग
शत अनामिकांचें या हें कबरस्तान
त्या अबल आसवांचें हें करुणनिधान
मखमली उशीपरि अवघें जीवित कार्य
हो मृदुल मंचकावर ज्यांचें बलिदान

पहिल्या आठ कडव्यांत 'ताजमहाला'कडे पाहणारा कवि सौंदर्यपूजक आहे. या शेवटच्या तीन कडव्यांत तो एकदम सर्वस्वीं सामाजिक बनतो. त्याचा हा सामाजिक दृष्टिकोन शहाजहानाच्या काळांतला असता तर या कवितेंत खाडखाड करीत प्रतिभेनें रूळ बदलल्याचा जो भास होतो तो झाला नसता. 'ताजमहाला'-

कडे आधुनिक अथवा सामाजिक दृष्टिकोनानें अनेकांनीं पाहिलें आहे. शरच्चंद्रांच्या शेषप्रश्नांतल्या एका प्रकरणांत असा एक दृष्टिकोन अत्यंत तीव्रतेनें प्रगट झाला आहे. पण या कवितेंत तो थोडा विरस करणारा वाटतो. मुमताज चवदाव्या बाळंतपणांत मृत्यु पावली असें ताजमहालांतल्या शिलालेखावरच कोरलेलें आहे, इतकीं बाळंतपणें तिच्यावर लादणाऱ्या शहाजहानाचें तिच्यावर उत्कट प्रेम होतें असें म्हणणें म्हणजे प्रेमभावना आणि कामवासना यांच्यांतल्या अंतराविषयीं अज्ञान प्रगट करण्यासारखें आहे, ताजमहाल पाहिल्यावर खऱ्या कविमनाला आनंदाऐवजीं दुःखच झालें पाहिजे, अशा अर्थाचे उद्गार अगदीं अलीकडेच मीं ऐकले आहेत ! ' ताजमहाला'वर कडकडून हल्ला चढविणाऱ्या या विविध विद्वानांना स्त्रीजातीविषयीं आणि दलितांविषयीं वाटणारा जिव्हाळा उसना आहे असें मी म्हणत नाहीं. पण भावनेच्या भरांत ते वस्तुस्थितीकडे पाठ फिरवीत आहेत असें मला वाटतें. शहाजहानाच्या वेळीं र. धों. कर्वे नव्हते, त्या बादशहाला ' समाज-स्वास्थ्य ' मासिक कधींच वाचायला मिळालें नव्हतें, हा सारा काय त्याचाच अपराध ? परवांपरवांपर्यंत ज्या देशांत गरिबांना आणि दुर्बळांना सुद्धां दहादहा पंधरापंधरा मुलें होत असत आणि हें होणें परमेश्वराचें देणें आहे असें मानून तीं माणसें कालक्रमणा करीत असत, तिथें मयूरासनावर विराजमान झालेल्या बादशहाला आपल्या लाडक्या बेगमेच्या चौदाव्या बाळंतपणाची भीति कां वाटावी ? ' ताजमहाला'चें खरें काव्य मुलानें बंदिखान्यांत टाकलेला आणि देहानें लुला-पांगळा झालेला शहाजहान त्याच्या प्रतिबिंबावर जें प्रेम करतो, मुमताजच्या सहवासांत घालविलेल्या शेंकडों मधुर स्मृतींचीं कवचें आपल्या जीर्ण देहावर लेवून रोग, वार्धक्य, कृतघ्नता आणि मृत्यु यांच्या विषारी बाणांपासून, क्षणभर कां होईना, स्वतःचें जें संरक्षण करूं शकतो त्यांत आहे.

' ताजमहाल ' या कवितेंत ' देहलालसे'चा प्रीतीशीं विसंगत असलेली वासना म्हणून उल्लेख आला आहे. पण खरोखरच अनुरक्त स्त्रीपुरुषांची प्रीति आणि ' देहवासना ' या गोष्टी इतक्या भिन्न आहेत काय ? कीं ही भिन्नता तावातावानें प्रतिपादन करून कळत न कळत समाज दंभाचा आश्रय करीत असतो ? निष्काम प्रेम ( Platonic Love ) हें निव्वळ थोतांड नाहीं ! पण त्याचप्रमाणें उठल्यासुटल्या प्रत्येकाला सहजसाध्य होईल अशा पातळीवरलें तें प्रेम नव्हे ! शरीर आणि त्याच्या अनुषंगानें येणाऱ्या सर्व वासना ज्या कळांत हीन मानल्या

जात असत, त्या काळांत आपण आतां राहत नाहीं. विरक्ति हेंच मनुष्याचें अंतिम ध्येय आहे असें ज्या संस्कृतींत अट्टाहासानें प्रतिपादन केलें जात असे, त्या संस्कृतींतलें सोनें कोणतें आणि हीण कोणतें याचा आपण गेलें एक शतक विचार करीत आहों. अशा स्थितींत स्त्रीपुरुषांच्या प्रेमसंबंधांत कामभावना अपरिहार्य आहे, तिचें आंधळ्या लोलुपतेंत होणारें रूपांतरच तेवढें जीवनाला मारक असतें, असें साहित्यिकांनीं आणि विचारवंतांनीं स्पष्टपणें समाजाला सांगितलें पाहिजे.

'कामभावना' आणि 'कामवासना' असा मीं केलेला भेद ही केवळ एक शाब्दिक कसरत आहे असें अनेकांना वाटेल. पण जीवनांतल्या या दोन्ही अनुभवांचीं चित्रें कुसुमाग्रजांच्या प्रेमविषयक कवितांतच आढळतात. 'नव्हतें माहित' या सूचकतेनें सुंदर झालेल्या कवितेंत अशरीरिणी प्रीति हें मानवी मनानें निर्मिलेलें मृगजळ आहे हें कवीनें मोठ्या कुशलतेनें दर्शविलें आहे. प्रीतीच्या आणि म्हणूनच पावित्र्याच्या खोट्या कल्पनांच्या आहारीं गेलेली एक तरुणी प्रियकराच्या पहिल्या शारीरिक स्पर्शाचा धिक्कार करते, पशु म्हणून संतापानें त्याला तिरस्कारते. तो पशु असता तर असल्या शाब्दिक प्रतिकाराला त्यानें कधींच भीक घातली नसती. पण तो खराखुरा मनुष्य आहे, प्रेमभावनेनें ज्याचें हृदय आर्द्र झालें आहे असा सुसंस्कृत प्रियकर आहे. आपला स्पर्श तिला आवडत नाहीं, तेव्हां हा मर्यादेचा अतिक्रम आपल्या हातून पुन्हां होतां उपयोगी नाहीं एवढेंच तो स्वतःला बजावतो—तिची क्षमा मागतो. प्रेम ही जर केवळ आत्मिक अशी गोष्ट असती तर एवढ्यावर हें प्रकरण संपायला कांहींच हरकत नव्हती. पण तसें होत नाहीं. जें घडतें तें अगदीं निराळें. निष्काम प्रेमाच्या पुरोहितांचे डोळे क्षणभर पांढरे व्हावेत असें! तें काय तें कवीच्याच शब्दांत ऐकलें पाहिजे. या कवितेंतली नायिका यानंतरचा आपला अनुभव सांगते—

तुझ्याकडे मी अजून येतें
विवाद रंगत पुन्हां, परंतु—
तूंच बोलसी, वाट बघें मी
होशिल केव्हां पुन्हां पशू तूं

या कवितेच्या पाठोपाठ 'दोन याचक' ही कविता वाचली कीं कामभावना आणि कामवासना यांतील मर्यादा दाखविणारी सूक्ष्म रेषा कुठें सुरू होते आणि

कुठें संपते हें लगेच लक्षांत येतें. पोटासाठीं घरदार सोडून मृत्यूच्या मुखांत उभा असलेला एक सैनिक आणि घरदार हा शब्दच जिच्या कोशांत नाहीं, जी पोटासाठीं वणवण भटकत आहे अशी एक भिकारीण यांच्या क्षणिक शरीरसंबंधाची ही कहाणी आहे. मृत्यूच्या छायेंतल्या त्या पुरुषाच्या अतृप्त शरीराला मिळेल तसलें सुख हवें होतें, मृत्यूच्या छायेंत उभ्या असलेल्या त्या उपाशी भिकारणीला टीचभर पोटाची खळगी ज्याच्यामुळें भरेल असें कांहीं हवें होतें. नाइलाजानें आपलें शरीर कुठल्या तरी मुत्सद्यांना विकून त्यानें पैसा मिळविला होता! आपलें शरीर नाइलाजानें त्याला विकून तिनें त्यांतला कांहीं भाग मिळविला! मृत्यूच्या छायेंत जीवनमूल्यांची कदर करणें मोठमोठ्यांना जमत नाहीं. तिथें या बिचाऱ्यांचा काय पाड? हें शरीरमीलन किळसवाणें तर खरेंच. पण त्याची नुसती किळस वाटून उपयोगी नाहीं. त्याच्या पार्श्वभूमींत जें कारुण्य आहे त्याची जगाला जेव्हां जाणीव होईल तेव्हांच कामवासनेची निंदा करण्याचा अधिकार त्याला प्राप्त होईल.

या संग्रहांतल्या प्रेमगीतांत कुसुमाग्रजांनीं चित्रित केलेल्या प्रीतीच्या अनेक छटा हृदयंगम आहेत. वैयक्तिक आवड म्हणून उल्लेख करावयाचाच झाला तर 'उत्तररात्रीं', 'अबोध' आणि 'उषाच गमसी' या कवितांकडे मी बोट दाखवीन. मनुष्याच्या शरिराची दुर्बळता आणि त्याच्या आत्म्याची आर्तता 'अबोध' मधें किती मोजक्या ओळींत सुंदर रीतीनें प्रगट झाली आहे. 'उषाच गमसी' ही या पुष्पसंग्रहांतली जुईची कळी आहे एवढें म्हटलें म्हणजे पुरें.

कुसुमाग्रजांच्या विविध कवितांत 'उणीव' व 'समाधान' यांना उपरोधानें खुमारी आणली आहे. 'जीर्ण देवळापुढें', 'एकाकी हा जागे', 'सुदामा' वगैरे कविता भावनांच्या छटांमुळें आकर्षक झाल्या आहेत. विशेषतः 'सुदामा' या कवितेंतल्या पौराणिक कथासूत्राला कवीनें दिलेली कलाटणी मोठी हृद्य वाटते.

या कवितांतल्या 'मी काय तुला वाहूं', 'मातीचें घर', 'येशिल का आज दुपारीं', 'दूर निनादे', 'एकदां ऐकलें', 'अज्ञात' इत्यादि कवितांचा एक निराळा वर्ग केला पाहिजे. विशाखेंत फारसा न दिसलेला कविमनाचा एक पैलु या कवितांतून दृग्गोचर होतो. या कवनांपैकीं 'मी काय तुला वाहूं' ही कविता वाचतांना 'परापूजे'ची आठवण होणं अपरिहार्य आहे 'येशिल का आज दुपारीं' सारख्या कवितांत तांब्यांचें अनुकरण नसलें तरी त्यांची अशा प्रकारची कविता लिहिण्याची जी:एक विशिष्ट धाटणी होती ती हीं कवनें वाचतांना डोळयापुढें

तरंगूं लागते. कविमनाला लागलेली अज्ञाताची ओढ असें स्थूलमानानें या कवितांचें वर्णन करतां येईल. वाढत्या वयाबरोबर जीवनाचें कोडें सोडविण्याची इच्छा प्रत्येक मनुष्याला बेचेन करून सोडते. प्राचीन काळाप्रमाणें तो सर्वसाक्षी आणि सर्वशक्तिमान अशा परमेश्वरावर श्रद्धा ठेवूं शकत नाहीं, संतकवीप्रमाणें त्या चिच्छक्तीला माउली म्हणून आळवूं शकत नाहीं ! विज्ञानाच्या, जडवादाच्या आणि विविध सामाजिक समस्यांच्या संस्कारांनीं एक प्रकारची नास्तिकता त्याच्या मनामध्यें निर्माण झालेली असते. पण ती नास्तिकता त्याच्या मनाला संपूर्ण शांति देऊं शकत नाहीं. ज्ञाताच्या कुंपणावरून पलीकडे जाण्याच्या प्रबळ इच्छेनें तो अस्वस्थ होतो. केशवसुतांच्या ‘ हरपलें श्रेय ’ सारख्या कविता याच मनोवृत्तींतून निर्माण झाल्या आहेत. कुसुमाग्रजांच्या अशा प्रकारच्या कवितांपैकीं ‘ अज्ञात ’ ही रसिकांना निःसंशय आवडेल. तिच्यांत या विशिष्ट आर्तवृत्तीच्या जोडीनें त्यांचे काव्यगुणहि प्रगट झाले आहेत.

मात्र अशा प्रकारच्या थोड्या कविता कुसुमाग्रांजानीं लिहिल्या असल्या तरी तथाकथित गूढगुंजन किंवा आध्यात्मिकता यांच्याशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं. त्यांचा मनःपिंड साधुत्वाची पूजा करीत बसणाऱ्या विरक्त किंवा स्थितप्रज्ञ तत्त्वचिंतकाचा नाहीं. तो सौंदर्य आणि सामर्थ्य यांची पूजा करणाऱ्या आणि या पूजेंतूनच जगाला साधुत्वाचा साक्षात्कार होईल अशी श्रद्धा बाळगणाऱ्या कवीचा आणि क्रांतिकारकाचा आहे. या श्रद्धेमुळेंच त्यांच्या राष्ट्रीय, सामाजिक आणि मानवतावादी कवितांना कांहीं आगळें तेज चढतें. ‘ निळें चक्र ’ पासून ‘ मातीचा पुत्र ’ पर्यंत या संग्रहांतल्या सर्व कविता वाचतांना कुसुमाग्रजांची प्रतिभा जणुं कांहीं माहेराला आली आहे असा भास होतो. गेल्या दशकांतल्या भारताच्या जीवनांतल्या अनेक घटना आणि दुर्घटना या कवितांत प्रतिबिंबित झाल्या आहेत. त्यांत सुभाषबाबूंच्या पराक्रमाचें कौतुक आहे, गांधींच्या मृत्यूबद्दलचें दुःख आहे, बेचाळीसच्या चळवळींतल्या अज्ञात वीरांना वंदना आहे, देशाकरितां ज्यांनीं आपल्या जीविताची राखरांगोळी करून घेतली त्यांचें बलिदान वाया जाऊं नये म्हणून इतरांना दिलेला करडा इशारा आहे. ‘ चलेजाव ’च्या चळवळीपासून स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत देशांत जें राष्ट्रीय आंदोलन सुरू होतें त्याचीं अनेक प्रतिबिंबें या आवेशपूर्ण कवनांत आढळतात. दुभंगलेल्या देशाच्या पार्श्वभूमीवर चित्रित झालेलें आईचें हृदय ( निरोप ), राजकीय सत्तांतर

म्हणजे सामाजिक क्रांति नव्हे या कटुसत्याची जाणीव ( कायदा ), आजच्या अर्थयुगामुळें साऱ्या जीवनाला आलेली बाजारी अवकळा ( एकच गाणें ), ' एक मानतों मी मानवता योग तिची सेवा ' ही कवीची श्रद्धा ( वैष्णव ) आणि मानवजातीच्या सुखाचा शिल्पकार मनुष्यच आहे या सत्याची त्यानें प्रभावी वाणीनें केलेली घोषणा ( मातीचा पुत्र ) हीं सारीं चित्रें डोळ्यांपुढून तरळूं लागलीं आणि या कवितांतली प्रसंगीं करुण, प्रसंगीं कठोर, प्रसंगीं गंभीर, प्रसंगीं सावेश अशी वैखरी कानांत घुमूं लागली म्हणजे कुसुमाग्रजांची कविता किती संवेदनाशील, संस्कारक्षम आणि सामर्थ्यशाली आहे याची कल्पना येते.

कुसुमाग्रज आतां चाळिशी ओलांडत आहेत. त्यांच्या सर्वस्पर्शी प्रतिभेचें कौतुक महाराष्ट्रानें केलें आहे. अशा वेळीं त्यांच्याविषयींच्या अपेक्षा बोलून दाखविणें अनुचित ठरूं नये. ' किनारा ' मधल्या कांहीं कवितांत त्यांच्या काव्य-शक्तीचा उत्कृष्ट विलास दिसून येतो यांत शंका नाहीं. पण विशाल जीवन-दर्शनाच्या दृष्टीनें ' विशाखे'च्या निर्मात्यानें पुढें पाऊल टाकलें आहे असा भास मात्र या कवितांत क्वचितच होतो. राष्ट्रीय वृत्तीनें रसरसलेली कविता हा कुसुमाग्रजांच्या काव्यप्रतिभेचा अगदीं खास प्रांत. पण या विभागांतलीं ' माझा हिंदुस्थान', ' जयभारता ', ' ध्वजधारी ' वगैरे कवनें वाचलीं कीं त्यांत जातिवंत कवित्वापेक्षां शब्दप्रभु असलेल्या शाहिराची जडणघडणच अधिक आढळते. ' आजिंक्य निर्धार ' किंवा ' वेगवती ' यासारख्या अनेक कवनांसंबंधानें सुद्धां थोडेसें असेंच म्हणतां येईल. बेचाळीसनंतरच्या पांच वर्षांच्या प्रक्षुब्ध काळांत ही सर्व कविता लिहिली गेली, जनमनाच्या तात्कालिक आकांक्षा आणि आंदोलनें चित्रित करणें एवढाच तिचा हेतु होता असें कवीच्या बाजूनें म्हणतां येणार नाहीं असें नाहीं. पण अशा रचनेंत अनेकदां काव्य नसतें, केवळ काव्याभास असतो. चांगल्या कलावंतांतल्या अशा आभासांचेंच अंध अनुकरण होण्याचा संभव अधिक !

' किनारा ' मधील कवितांचा आस्वाद घेतांना माझ्या मनाला एक गोष्ट फार खटकली तिचाहि इथें उल्लेख करणें आवश्यक वाटतें. गेल्या पांच वर्षांत कुसुमा-ग्रजांनीं फारशी कविता लिहिली नाहीं. असें कां व्हावें ? प्रामाणिक कलावंताची प्रतिभा गुदमरून जावी अशी परिस्थिति आज आपल्या भोंवतालीं आहे हें कुणीच नाकबूल करूं शकत नाहीं. कुसुमाग्रजांची वीणा अबोल होऊं लागली आहे याचें

हेंच कारण आहे कीं गडकऱ्यांप्रमाणें गद्यलेखनांतलें यश त्यांना कवितेपासून दूर दूर नेत आहे ? दुसरा तर्क खरा असेल तर मराठी कवितेच्या दृष्टीनें ती आपत्ति ठरेल. अंधारांतल्या प्रवासांत कुसुमाग्रजांनीं गेलीं दहा पंधरा वर्षें ज्या ' पांथाला ' साथ दिली, आपल्या ' कडकडीत ' कवितेनें ज्याच्या मनांतला काळोख उजळविला, त्या वृद्ध चिरप्रवाश्याच्या पायांतल्या साऱ्या शंखला अजून कुठें तुटून अथवा गळून पडल्या आहेत ? कुसुमाग्रज त्याला ' तिमिरांतुनी तेजाकडे ' जायला सांगत आहेत. पण त्या नव्या प्रकाशाच्या छटा अजून आपल्या सामान्य जीवनाच्या क्षितिजावरच रेंगाळत आहेत. ज्या क्रांतीचा आपल्या ओजस्वी वाणीनें कुसुमाग्रजांनीं जयजयकार केला ती पुरी कुठें झाली आहे ? जनतेला जागृत करणारीं आणि नव्या जीवनमूल्यांची जाणीव देऊन तिला कार्यप्रवृत्त बनविणारीं गाणीं गाणारे कितीसे नवे कवी गेल्या दशकांत निमाण झाले आहेत ? वसंत बापट आणि विंदा करंदीकर हीं दोनच नांवें चटकन् जिव्हाग्रावर येतात. अशा स्थितींत कुसुमाग्रजांनीं आपल्या हातांतलें निशाण खालीं ठेवावें असें कोण म्हणेल ? तात्कालिकांतल्या चिरंतनाचा वेध घेण्याचें आणि त्याला काव्यस्वरूप देण्याचें दुर्मिळ सामर्थ्य त्यांच्या प्रतिभेनें एकवार प्रकर्षानें प्रगट केलें आहे. विनोबांच्या भूदानयज्ञासारख्या नव्या भव्य किंवा उदात्त गोष्टींचें आवाहन तिला कां मिळूं नये ? अनुभूतींच्या नव्या नव्या क्षेत्रांत तिनें पाऊल कां टाकूं नये ?

कुसुमाग्रज मनांत म्हणतील, ' या गृहस्थाला उगीच पुन्हां आपल्या काव्य-संग्रहाला प्रस्तावना लिहायला सांगितली. या संग्रहाला कवीनें ' किनारा ' हें नांव कां दिलें हें सुद्धां त्याला कळलेलें दिसत नाहीं. समुद्राला जशी किनाऱ्याची मर्यादा असते, तशा कलावंतालाहि अनेक मर्यादा असतात. ' त्या मर्यादांचें दुःख विचित्र आहे हे मी जाणतों. त्या दुःखाची–पुसट कां होईना–मलाहि कल्पना आहे. मी त्यांना एवढेच म्हणेन, ' किनारा ही समुद्राची मर्यादा आहे हें मी मान्य करतो. ती त्याला ओलांडतां येणार नाहीं. पण त्या मर्यादेमुळें समुद्रांतले मोत्यांचे शिंपले रिकामे पडण्याचें कांहींच कारण नाहीं ! '

कोल्हापूर
१–८–५२

वि. स. खांडेकर

● ● ●

# किनारा

आला किनारा !

निनादे नभीं नाविकांनो इशारा
आला किनारा !

उद्दाम दर्यामधें वादळी
जहाजें शिडावून हीं घातलीं
जुमानीत ना पामरांचा हकारा
आला किनारा !

सरायास संग्राम आला अतां
तपांची समोरी उभी सांगता
युगांच्या श्रमांचा दिसे हा निवारा
आला किनारा !

प्रकाशे दिव्याची पहा माळ ती
शलाका निळयालाल हिंदोलती
तमाला जणू अग्निचा ये फुलोरा
आला किनारा !

जयांनीं दलें येथ हाकारलीं
क्षणासाठि या जीवनें जाळलीं
सुखेनैव स्वीकारुनी शूल–कारा–
आला किनारा !

तयांच्या स्मृती गौरवें वन्दुनी
उभे अंतिच्या संगरा राहुनी
किनाऱ्यास झेंडे जयाचे उभारा
आला किनारा !

१९४६

# वर्षागमन

सजल श्याम घन गर्जत आले
बरसत आज तुषार्
आतां जीवनमय संसार् !

नाचवीत तळहातीं ज्वाला
वणव्यांच्या कमरेस मेखला—
बांधुनिया हा ग्रीष्म कृतांतापरी करी संचार् !

चार दिशांच्या भव्य कटाहीं
दिनरात्रींची तडकत लाही
भकास वाळूरणाप्रमाणें पसरे दीर्घ दुपार् !

लोपुन गेलें वसंतवैभव
सुगंध विरले नुरलें मार्दव
मंजुळ कोकिलकूजन सरलें होत सुने सहकार् !

आज सरें पण दहनसत्र तें
कुशींत घ्याया दग्ध जगातें
फुलवित हृदयीं तेज पातले जीवनदूत उदार् !

जळक्या पिवळ्या माळावरती
पुलकित गंधित झाली माती
बिजें तृणाचीं गर्भामधुनी देत नवा हुंकार् !

डोह कपारीमधील काळे
शेवाळ्यांतुनि उचलुनि डोळे
बघत केधवां येइल वाहत धावत जीवनधार् !

रित्या नद्या सुकलेले निर्झर
भकास रानें उदास डोंगर
कृतज्ञतेनें बघती श्रवती मेघांचे ललकार् !

१९५०

# तारका

तुझिया तांबूस तेजाची ज्योत
देखतां आकाशीं निरभ्र नील
जननांतरींचें अंतरीं गूढ
सौहृद उमले सुगंधशील !

अपार अंतर जोडून तुझे
प्रकाशकिरण धरतीवरी
येतात शोधत हृदय माझें
घरांत येणाऱ्या पांखरापरी !

रुपेरी पिसांची रचती शेज
माझिया श्रमल्या हृदयासाठीं
प्रकाश–पुष्पांचे गुंफती हार
माझिया उदास अंधारासाठीं !

स्नेहाचें रहस्य आपुल्या असें
निद्रिस्त जगास ठाऊक नाहीं
सस्मित होऊन आकाश मात्र
मीलन आपुलें पाहत राही !

१९४६

# विराट वड

गांवाच्या सीमेस नदीच्या तीरा
पारंब्या–फांद्यांचा घालून डेरा–
विषण्ण दृष्टीनें देखत नभा
विराट वड हा राहिला उभा !

काळाचीं असंख्य पाखरें आलीं
जीवन–कणिका टिपून गेलीं !

अनेक पिढ्यांची यात्रा विशाल
तयाच्या पुढून गेलेली पैल !

काळाशीं झुंजून राहिला जेता
विजय परी तो जाचतो आतां !

राक्षसी खोडास सहस्र तडे
पाचोळा अमाप पायाशीं पडे
आलेली देहाला पाषाणकळा
देवत्व जाऊन उरली शिळा !

नवीन पालवी क्वचित कोठें
जुनाट पानाचा देठ न तुटे !

फोडून दरड मुळें तीं कांहीं
शोधतीं ओलावा नदीच्या डोहीं–
पर्णांच्या गुहांत अंधार माजे
उषेचा किरण आंत न धजे !

लोंबतीं मोहळें भयाण काळीं
कोळ्यांचीं धूसर लागलीं जाळीं !

गिधाड घुबडें धरून शिरीं
कोकीळ पूर्वींचें स्मरतो उरीं !

भोंवती तयाच्या तरंगे भीति
सावली प्रवासी त्याची न घेती !

निर्दय अफवा विळखा घाली
रात्रीचा समंध बसतो खालीं !

गांवचीं बालकें राहून दूरी
भयार्त डोळ्यांनीं पाहतीं वरी !

लोटून काळास ठाकला धीट
आजला त्याचीच पाहतो वाट !

कर्वत कुऱ्हाड वाजतां रानीं
आशाळ भावानें ऐकतो ध्वनि !

परंतु हत्यारें क्षुद्र तीं हाय।
अशा या पहाडा पुढतीं काय ?

समर्थ आतां ती एकली वीज
देण्यास याजला विश्रांति नीज !

म्हणून तयाची उदास आशा
शोधते नभांत रुपेरी रेषा !

# आकाशित लहरी

आकाशित लहरी
—आल्या धावत माझ्या घरीं !

कृष्ण घनांतुन
गर्द वनांतुन
हिममय शीतल
गिरिशिखरांतुन
दरियावरचें
वादळ भीषण
धुमाळलेलें
वणव्याचें रण
उजाड निर्जन
माळ जिराइत
उपवन कुसुमित—
या सर्वांतुन
हांसत नाचत
अमित गतीनें
माझ्या इवल्या घरीं
आल्या आकाशित लहरी !

दूरदूरचीं
ऐकिव नगरें !
अज्ञाताच्या
अथांगतेंतुन
लुटून दौलत
भरुन तारवें
येत पऱ्या या
शिडें उभारुन
सान दिव्यांचें
छोटें बंदर
सुवर्णनौका
तिथें विसावुन
येत किनाऱ्यावरी
घेउन भरलेले घट शिरीं !
कांति कुणाची
नील रुपेरी
लखलखणाऱ्या
कुणि समशेरी

मृदुल फुलांचें
वसन कुणाला
कुणी अनावृत
स्वरूपशीला
मुरडत वांकत
घराकडे मम
रम्य तयांची
हो रहदारी
करित प्रतीक्षा
मम नजरेची
उभ्या उंबऱ्यावरी !
आल्या आकाशित लहरी !
अधरिं कुणाच्या
कोकिळ—कूजन
कुणी वाहती
ज्ञानाचें धन

फुलवित येती
कुणी अग्निकण
ज्यांत उद्याचें
भरे रणांगण !

परि अयघ्यांची
एक मनीषा—
नक्षत्रांच्या
निळया पथांतुन
व्योमनदीच्या
जलांत न्हाउन
चंद्रकरांना
वाट विचारित
करावयाला
बोधन रंजन
यावें माझ्या घरीं
आल्या आकाशिंच्या लहरी !

# मायदेशाचा वारा

झेपतो, बिलगतो, फिरतो भंवति भरारा
हा काय माझिया मायदेशचा वारा !

द्राक्षांचे बहरत बाग मनोहर जेथें
त्या सुनीत वेली रांग पऱ्यांची गमते
लेऊन उभ्या जणु हिरव्या नव वसनातें
कटिकण्ठावरती वरती मौक्तिकहारा
हा काय माझिया मायदेशचा वारा !

ते नागवेलिचे माण्डव शीतल शान्त
विश्रान्तिच जेथें झालेली विश्रान्त
विहिरीवर नादे सुरेल जीवनगीत
काळींत वाहती सन्थ रुपेरी धारा
हा काय माझिया मायदेशचा वारा !

उठतात धुराच्या रुखावळींतुन रेषा
स्वप्नापरि सुन्दर, आक्रमती अवकाशा

लाजत्या नदीवर डोलत हिरव्या आशा
त्या अमल जगांतिल आणसि येथ निवारा
हा काय माझिया मायदेशचा वारा !

रसरसते जेथें कनकरसांत प्रभात
चांदण्यांत उमले निशिगन्धापरि रात
जात्यावर घुमतो मंजुळ जेथ निशान्त
रसतुषार तेथिल वाहसि काय उदारा,
हा काय माझिया मायदेशचा वारा !

कीं याच दिशेला असेल देखत कोणी
नेत्रांतुनि शिंपित सुनेपणावर पाणी
त्या हृदयामधली करुणरसार्त विराणी
तव लहरींवरती लहरत मात्र समीरा,
हा काय माझिया मायदेशचा वारा !

१९४५

# उत्तररात्रीं

निःशब्द शांतता ! विश्वचि अवघें शांत !
दशदिशांत कांठोकांठ दाटली रात !
जग विराट पक्षापरी मिटोनी पंख
कुहरांत निशेच्या पडलें श्रांत निवांत !

अंधार भरे, अंधार उरे क्षितिजांत
रंगाकृति विरल्या चराचरांच्या त्यांत
त्या गहन अभावावरी तरंगत तारे
जणु कबरीवरती कुसुमांची बरसात !

रण भीषण सरलें, विरले विजयी घोष !
आक्रोशुन पडले कंठ बळींचे शोष
आशांचीं शकलें कवळुनिया हृदयाशीं
हतभाग जाहले स्वप्नांमधि बेहोष.

निद्रिस्त जगांतुन फिरतो मंद समीर
घोंगावत घाली गस्त मधून गभीर
वा स्मशानभूवर भ्रमे एकला कोणी
मरणाचें इंधन सारित वेडा पीर !

ती सुवर्णयात्रा खंडित घडिभर झाली
बाजारपथांच्या झाल्या रिक्त पखाली
श्रम बिलगुन पडले कुशींत विश्रांतीच्या
मालवल्या ज्योती उंच विलासमहालीं !

हो वसुंधरा ही विगलित आणि मलूल,
आकाशफुलांचें पाहत स्वप्न विशाल
निद्रांकित झाली, प्रकाशवस्त्र गळालें
थबकून उशाशीं उभा राहिला काल !

जमतील उद्या त्या पुनरपि जीवन–कणिका
गगनांत शांत या भरतिल कर्कश हांका
या सुन्या पथावर पडतिल चरण असंख्य
पेटवतिल कणवा भूवर सूर्य-शलाका !

कां अजून जीवा, जागसि जळसि अकेला
शुक्राचा तारा तळपत देख उदेला
–विझवून दिवे हे दाहक हृदयामधले
विश्रांत सख्या हो, ओसरते ही वेला !

१९४४

# प्रीतीसाठीं प्रीति

प्रीतीसाठिच प्रीति घोष घुमतो प्रीती चिरंजीविनी
आहे तींत उदात्तता म्हणत ते ती ईश्वरी भावना !

वीणा छेडित गात संतत तिचें दिव्यत्व वागीश्वरी
होतों मुग्धच मी, परंतु मज ती थोरीव ना जाणवे.

माझ्या प्रीतित दिव्यता न असली ती मानवी सर्वथा
आहे ती तुझियावरी नि रमते ती वर्तमानामधें !

कोठें शाश्वत या अशाश्वत जगीं, ज्या अंतरीं ही उदे
तेंही नश्वर, वाहतें अनुदिनीं शून्याकडे जीवन !

विश्वाचींहि फुलें गळून पडतीं आकाशगंगेमधें
प्रीतीलाच कसा चिरंतनपणा जी जन्मली नश्वरीं

आहे एकचि सत्य, तेंहि तुजला व्हावें दिलासा न का ?

चाले जो क्षण त्यावरी विहरते गे नाममुद्रा तुझी !

जाणाऱ्या घटकेंत जीवित भरे, अज्ञात आहे उद्या
व्हावें दुःखित कां तिची प्रणयिनी, मांडूनिया कुंडली !

# निळा पक्षी

उषःकालचें प्रकाशमंडल येतां प्राचीवर
निळें पाखरूं त्यांतुन कोणी अवतरलें सुन्दर
फुलराणींचें विलासतारूं निळीं उभारुनि शिडें
सोनेरी दरियांतुन आलें—आलें माझ्याकडे !

पालवलेल्या मृदुल पाकळ्या पंखांच्या मिटवुन
झालें ज्यांवर दिसे उषेच्या किरणांचें सिंचन—
स्वप्न निळें तें बसे अंगणीं हिरव्या वेलीवरी
आकाशाचा आशीर्वादच आला माझ्या घरीं !

फुलवुनि अपुला दिव्य पिसारा नाच पदांचा करी
नवरत्नांचा झुलतो पंखा गमे लतेच्या शिरीं !

बरसुं लागलीं गीतें मंजुळ कोमल कंठांतुन
स्वरलहरींनीं वेढुन गेलें सारें मम जीवन
जिवाभोंवती वितरुनि माझ्या घडीभरी लाघव
हन्त, नभीं तें निघून गेलें मखमाली मार्दव !

उदासवाणे नेत्र शोधती जें कोठेंही नसे
गलित पाकळ्यांतुनी जुळावें पुन्हा पुष्प तें कसें?

निळ्या अनंता मिळून गेला माझा पक्षी निळा
रखरखती भंवताली आतां माध्यान्हीच्या झळा !

१९४६

## शृंखला

अमल तुझ्या नेत्रांत नाचतें
नवतीचें चांदणें
हृदयाभवती तुझ्या रुपेरी
स्वप्नांचीं कोंदणें !

किशोरपण ये मावळतीला
आतां उदयाचलीं
झगमगते नवलाख दिव्यांची
पहिली दीपावली
वसंतवैभव वाजत गाजत
आलें तुझिया घरीं
मदिर फुलांची पखरण होते
तुझिया वाटेवरी
किमया अभिनव तुझ्या करीं ये
स्पर्श तुझा लाभतां
लोहशलाकेंतून लकाके
कनकाची दिव्यता !

विचलित अंचल, सूर्यफुलांचे
दोन कळे त्यांतुनी

मधुर भविष्याकडे पाहती
लाजत डोकावुनी !

नको पांखरा, घरटें घालूं
नको उसासे असे
उदासीनता प्रौढ जीविता
वेढुन येथें बसे !

घडिभर कूजन तुझें कोकिळे
मंजुळलें जीवनीं
यांतच आहे समाधान मज
ना अधिकाचा धनी !

पसरुन जा फुलपंख आपुले
आलापित लावणी
चैत्र जेथल्या वनांत करतो
पाचूंची पेरणी !

नवतीचा तव गंध असा जर
रेंगाळत राहिला
हाहि इशारा व्यर्थ, बांधतिल
माझ्या मज शृंखला !

# कां येतेस पुनःपुन्हा—

कां येतेस पुनःपुन्हा प्रणयिनी मार्गामधें माझिया
आहे ठाउक हें तुला न उरलें तें भावनाबंधन
होतें एक दिनीं अशांत जळतें जें अंतरीं सौख्यद
त्याची शीतल मृत्तिकामय उरे आतां समाधी इथें.

गेला कालहि जेधवा गवसलीं पुष्पें मरूभूवरी
होतां मीलन चंद्रमाहि नसतां जेव्हां फुले चंद्रिका
सोनेरी कर प्रीतिचे विहरतां वर्षेतल्या जीवनीं
झालें जीवित इंद्रगोफ, विळखा स्वर्गास घाली धरा.

आतां काय उरे—खुडीत बसला हेमंत पर्णावली
सौंदर्याविन चंद्रमा, थिजतसे व्योमामधें चांदणें
रत्नांचा उरला न साज, वसनें आतां न तीं कांचनी—
येई खिन्न धुक्यांत योगिनिपरी ही श्वेतवस्त्रा उषा !

स्वप्नांची किमया सरे क्रमित मी मार्गास जागेपणीं
कां येऊन पुनःपुन्हा वितरसी हे मोह जे मोह ना !

१९४६

# नव्हतें माहित

नव्हतें माहित मला तुझें मन
विशंकतेनें होतें बोलत
नव्हतें माहित, धुंद तुझे ते
डोळे होते कांहीं शोधत —

करीत होतें विवाद–तांडव
तोंच तुझा कर ये स्कंधावर
मिठी पडे तव, कळलें नाहीं
काय पुढें घडलें तें क्षणभर !

उठलें झांपुन, संतापुन मी
म्हटलें तुजला पशू–पाशवी —
विरघळुनी डोळ्यांतिल धुंदी
चांचरसी तूं "क्षमा असावी !"

तुझ्याकडे मी अजून येतें
विवाद रंगत पुन्हां, परंतु —
तूंच बोलसी, वाट बघें मी
होशिल केव्हां पुन्हां पशू तूं !

# दोन याचक

मलीन खाकी गणवेषांतिल
सैनिक तरणाताठा कोणी
नांव ? कशाचें—नाममात्र तें
बाहूवरची बघा निशाणी !

शरीर विकुनी पोटासाठीं
एक थेंब हा सरितेसंगें
प्रवाह नेई तिकडे जाई
धावत वाहत मरणामागें !

मैदानावर पडे छावणी
फुगीर डेरे अवतीभंवती
कबूतरांचा जणू थवा हा
थकून बैसे जमिनीवरती

त्या गर्दीच्या सीमेवर हा
तरूतळीं बसला एकाकी
गर्द सावली, गाढ शांतता,
वाराही पद हळूच टाकी

दुर्लभ वेळा असते असली
ऐकत होता संथ पडोनी
खाकीखालीं धडधडणाऱ्या
व्यक्तित्वाची करुण कहाणी

कुणी भिकारिण आली तेथें
नांव? कशाचें— नाममात्र तें
होती नवथर त्या नवतीला
झाकाया नच वस्त्रहि पुरतें!

कळकट चोळीच्या चिंधींतुन
स्तन डोकावत उंच सावळे
तलम अनावृत दिसे कातडी
लाचारीचे विशाल डोळे!

उभी राहिली समोर त्याच्या
उपसत कंठामधुनी ताना
बोलपटांतिल परिचित गीतें—
म्हणे अखेरीं 'कांहीं द्या ना!'

'कांहीं द्या ना' जीभ न केवळ
शरीर अवघें होतें मागत,
ते डोळे, ते स्तन, ती मांडी
सारे उदरास्तव आक्रोशत!

शूर शिपाई किंचित् बुजला
संकोचाची छटा मुखावर
खिशांत गेले हात परंतू—
नजरेंतुन ओसंडे काहुर

त्यासहि होतें हवें कांहिसें
कसेंतरी तें कळवी, कळलें
दुनियेपासुनि तुटलेले ते
दोन अनामिक जवळी आले

दूर जरा दरडीच्या खालीं
मच्छरदाणी करिती पर्णें
नीरवतेवर मुद्रित झालें
विविध भुकांचें एकच गाणें
एकच नाणें!

१९४८

# देणगी

तुझ्या सावलीत
विसावला जीव
उमले राजीव
चांदण्यांत !

युगायुगाची रे
मावळे झांकळ
हृदयीं उजळ
कांहीं भासे.

प्रकाशाचीं फुलें
शृंगारत रात
आलीं अंधारांत
माझ्याकडे.

अंतरींचे गूढ
उकलले धागे
जीवित हो जागें
थरारोनी !

धुक्यांतून नादे
पैंजणांचा रव
स्वप्नाशांचा नव
जमे मेळा.

तुझ्या स्पर्शे झाले
गंजलेले क्षण
सुवर्णाचे कण
जादूगारा !

पाखरांच्या परी
गीत आलापीत
गेलें झंकारीत
जीवनास !

जीवनच सारें
मुखरित झालें
अणूरेणू न्हाले
संगीतांत !

आणि आज पुन्हां
अज्ञातांत जाशी
उरे माझ्यापाशीं
देणगी ही.

तर्जनी हो दूर
तरी वीणेवर
राहतील स्वर
रेंगाळत !

# पुन्हां

यौवनाच्या नव्हाळीची
गेली माया ओसरून
गंधर्वांच्या पायखुणा
गेलों होतों विसरून–

स्वप्नमंदिराचे चिरे
निखळत दुभंगत
अनोळखी नजरेनें
होतों सारें न्याहाळीत !

जीवनाची वाट झाली
पायाखालीं शिलामय
मावळली भाविकता
रिकामें हो देवालय !

अंतरींच्या अंगाराचे
लाल किरमिजी कण
गेले, राही संथता ही
रंगहीन अचेतन !

तोंच तुझें कूजन ये
अचानक कानावर
स्मितांतून परिमळे
वासंतिक सहकार !

जायचें का भविष्य गे
पुन्हा आतां भूतांतून
पुन्हां आशानिराशा त्या
पुन्हां हृदयाचें रण !

१९४६

# मीलन

मावळे अथांग अन्धार आज
होतसे जीवित सफल सांग
संपली प्रतीक्षा, संकोच, शंका
उजळे असंख्य दीपांची रांग !

हृदयें अशान्त एकाकी दोन
युगांच्या तमांत चालत वाट
परस्परास जीं शोधत होतीं
आज हो अखेर मीलनभेट !

गातात तारका, ऐकूं ये आतां
आकाशगंगेच्या किनाऱ्यावर
चंद्राच्या भोंवती गुंफीत गोफ
प्रीतीचे अमर संगीतस्वर.

नीलिम्यामधून नभाच्या, कळ
निथळे स्वर्गीय सुगंधी दंव
जीवनकमलावरती, फुले
रेशमी पाकळी एकेक नव !

समुद्रलाटांच्या नौकेंत निळ्या
व्हायचा आपुला प्रवास आज
मेघांच्या मंचकीं मृदुल शुभ्र
साजरी होईल आपुली शेज !

काळाचा प्रवाह थांबला आतां
आपुल्या दोघांच्या चरणापाशीं
वितळे विराट संसार सारा
दोघेंच उरलों विश्वाच्या कोषीं!

१९४५

# वनराणी

आज पहाटे वनराणी
सदनीं माझ्या ये कोणी
झंकारित वीणा अपुली
पहांटताऱ्यासह आली
सौंदर्यासह गीत असें
यक्षांच्या जगतांत वसे
वसन मनोरम
इंद्रधनूसम
नेत्रांतून निळ्या तिचिया
पुनवेची निथळे किमया !
विचरत सदनाभंवतालीं
तृणावरोनी मखमाली
कुंजाकुंजामधून ती
पाउल टाकी मंदगति
फुलवेली हृदयीं धरुनी
हितगुज कांहींसें करुनी

नव कलिकांवर
फिरवी निज कर
प्राचीवर चढतां लाली
कलिकांचीं कुसुमें झालीं !

उधळित मंजुळ रवलहरी
मजजवळी ती येत परी
जागवुनी माझ्या हृदया
स्नेहाची विखरी माया
स्पर्शुन त्यांतिल भावदलां
फुलवी स्वप्नांची माला
करीत गायन
जाई परतुन
प्राचीवर चढतां लाली
अवघीं तीं स्वप्नें सरलीं !

# ताजमहाल

वर पूर्ण चंद्रमा पसरी मायाजाल
वसुधेच्या वदनीं लहरे हास्य सलील
तें समूर्त होउन तीरावर यमुनेच्या
हिमशुभ्र उभा हा संगमरवर विशाल !

कुणि देवदूत वा फुलवुनि पंख फुलांचे
तीरावर बसला मोजित कण शतकांचे
दे सुवर्णपूजक जनतेला सन्देश
'धन एकच आहे जगतीं अमर कलेचें !'

कीं कालिंदीवर करण्याला जलकेली
कुणि यक्षलोकिंची रूपगर्विता आली
त्या नितळ दर्पणीं विवस्त्र होउनि पाही
निज लावण्याची उसासलेली वेली !

वा काव्य मनोहर, हो रचनेंत बहार
यमकांपरि गमती भव्य समान मिनार
वर विहग कल्पना कलानंद बेहोष
तळिं समाधिस्थ हो पण कारुण्य अपार !

पुनवेच्या अथवा सुधाशयावर शान्त
हो विहार करुनी राजहंस विश्रान्त !
चंद्रिका-मधूनें भरे धरेचा पेला
हा तरंग मोत्यापरी तरारे त्यांत !

जें घुमलें स्फुरलें असंख्यशा हृदयांत
प्रीतीचें उज्ज्वल उन्मादक संगीत
मधुगीताची त्या ही मंजूळ लकेर
चालली युगांतुन एका अन्य युगांत !

कीं ब्रह्मांडाच्या अथांग या कासारीं
ग्रहनक्षत्रांचीं फुललीं कमलें सारीं
या भू-पद्माच्या एक पाकळीवरती
हा थेंब दंवाचा विलसे विमल रुपेरी !

हा अमर मानवी प्रतिभेचा शृंगार
तो उन्मन होता अथवा रचनाकार
स्वप्नांत पाहिला इंद्रमहाल, उठोनी
या धवल शिलेंतुन करी स्वप्न साकार !

कीं असत्य केवळ प्रणयाचें प्राचीन
खोटीच देवता, मंदिर मात्र महान
वर उदात्ततेचे हे स्वर्गीय मनोरे
दडलेली खालीं देहलालसा हीन !

कामान्ध शहाचे सजवायास पलंग
अपराध एकला ज्यांचा स्त्रीत्व अपंग
ओढल्या किती त्या रमणी राणिवशांत
तो असे अनात्मा, नाहीं मदन अनंग !

शत अनामिकांचें त्या हें कबरस्तान
त्या अबल आसवांचें हें करुण निधान
मखमली उशीपरि अवघें जीवितकार्य
हो मृदुल मंचकावर ज्यांचें बलिदान !

## अधरीं हांसूं

अधरीं हांसूं
डोळयांत आसूं
निरोप घ्याया
आलीस जेव्हां
वाटलें पुढें
विरहव्यथा
कशीही सोसूं ?

सांगती नेत्र
संपली रात्र
चांदणी रम्य
विफल क्रूरा,
केलेंस स्वप्न,
केलेस उगा
कलह मात्र !

हन्त न कळे
वेळ ओघळे
जीवन क्षण

कांचन कण
ओंजळींतुनी !
हृदयें दोन
होतात सुनीं
एकलेपणा
उदास जळे !
तमाच्या दाट
मांडवावरी
उषेची वेल
मोहरे लाल
सोनेरी फुलें
खुडून येई
फुलारी दारीं
पुकार करी
राहतों धुन्द
अंधारीं आंत
निघून आणि
फुलारी जात !

# उषास्वप्न

सखे, मृगजलांत मी कमलिनीपरी नाहलें,
प्रकाशकिरणांत या नवल हन्त तें संपलें.
जगा गमत मित्र तो रवि मलाच हो वंचक.
उदास मरुभूपरी दिसत हा रिता मंचक !

तुझे चरण लागतां उगवतीस नारायणा,
सुवर्णलहरींवरी विहग जात तारांगणा.
परी मजसि शाप तो, हृदयपाखरूं बापडें
विपक्ष घरट्यामधें विकल होउनीया पडे !

द्युतींत तव नाहुनी कनकवर्ण होई धरा,
मलाच तिमिरांत कां बुडविसी प्रकाशेश्वरा ?
मनोगत लतेवरी सुमनरूप साकारलें,
मनोगत मदीय रे परि तवागमीं भंगलें !

सखे, अननुभूतशी उदित हो मनीं भावना,
उगाच रुधिरांतुनी लहरु लागली चेतना.
उशीवरति टेकतां शिर निशीं उगा वाटलें
चहूंकडुनि वर्षती तनुवरी सुगंधी फुलें—

उगाच गमलें कुठें मधुर तार झंकारते,
स्वरांवरि सकंप त्या हृदय आंत हिंदोलतें !

गमे कुणि तरी कुठें कुजबुजे मला बोलवी,
कुणी श्वसन रोधुनी दुरुनिया करां पालवी !
क्षणीं विहरुं लागलें अतल यक्षदेशांतरीं
प्रफुल्ल कमलापरी पुनव जेथ नीलाम्बरीं.
प्रसन्न गगनांत त्या तरल भव्य मेघावर,
मनोहर दिसे मला सुरधनूपरी मन्दिर !

तिथें मदनरूप तो प्रिय सुहास होता उभा,
विशाल नयनीं फुले अभय यौवनाची प्रभा !
तयास बघतां सखे, वळत नेत्र पायांकडे
अशान्त हृदयांत हो, नव अबोध भीती जडे !

करी स्मित सरे पुढें धरुनिया करानें मला,
म्हणे मजसि आर्जवें 'अमर मंदिरीं या चला',
समीरलहरींवरी पतित पर्ण जातें जसें
तशीच सखयास मी अनुसरें, कळे ना कसें !

महाल–निथळे तिथें अणुअणूंतुनी चांदणें
सुरेशभुवनींहि ना विभव रम्य तें नांदणें
'कुठें असत मी' असें वदत चित्त भांबावुन,
धरून करपाशि तो म्हणत 'हें प्रिये यौवन !'

कवेंत मज वेढुनी, फिरवुनी करां कुंतलीं,
मदान्ध नयनांतुनी नयनिं वारुणी ओतली !
मुलायम जलापरी, परिमलार्त वायूपरी
सुवर्णमय मंचका बघुनिया थरारे उरीं !

फुलांमधिल रम्यता, विधुकरांतली चारुता,
सुधेमधिल माधुरी, मधुमधील बेहोषता,
अजाण मम जीवनावर उधाणला संगम,
लतेसि पहिला जसा करित धुंद पुष्पागम !

सखे, कथुं कसें पुढें हळुच ओढली मेखला
नको म्हणत मी तरी लव दया न त्या ये खला
गळून विनयापरी वसन गे पडे रेशमी
तशीच सरुनी पुढें विजविला सखे, दीप मी—

सखे, विजविला दिवा—विजविलेच सारे दिवे !
भयें मजसि जाग ये, सकल लोपलीं वैभवें !
कुठें न अनिरुद्ध तो प्रणय, तें कुठें मंदिर ?
कठोर पडला कळे किरण मात्र नेत्रावर !

# सैनिक

शिबिरामधुनी रणांगणाचा डंका दुमदुमला
भर आतां सखि, तुझ्या हातचा शेवटचा पेला!

देहाचा घट भरून दिधलें जीवन जगतानें
त्या जगतास्तव रिता घडा हा हवा करायाला!

सैनिक मी मज कसे दिसावे तत्त्वांचे तारे
कळे कशास्तव तरी व्हायचें सिद्ध संगराला.

यज्ञ चालला हवें कराया दान जीविताचें
भविष्यकाळीं मिळेल कांहीं सौख्य मानवाला!

क्षणाक्षणांचीं जुळून रत्नें हो जीवनहार
कुणास ठावें तुटेल कोठें अमोल ही माला !

फेसळती या द्राक्षसुधेवर जगण्याचे मोह
मरणापूर्वी प्राशन करुं दे ही फुलतो ज्वाला !

हिममय हात यमाचे पडतिल गळ्यावरी समरीं
मधुर उष्णतेमधें मिठीच्या विसावुं दे मजला.

आलों परदेशांत मुशाफिर ना ओळखदेख
मरणाच्या छायेंत जपूं का नीति–अनीतीला ?

कशास कोमल हवी कराया गुम्फण प्रीतीची
दोन घडीची जर ही केवळ जीवन–पडशाला !

पुरें असें कीं असती रमणी रम्य असे मदिरा
रम्य असे हा शेवटचा क्षण सुख सेवायाला !

१९४५

# अबोध

याच उशीवर तुझे रेशमी कुन्तल सळसळले
सैल केशबन्धांतुनि खालीं गुलाब ओघळले !

विलग पाकळचा होउन पडले उशीवरी गेन्द
मखमाली कोषांतिल अपुल्या उधळित आनन्द

निद्रावश नजरेंत चान्दणें उन्मादक फुललें
अन्तरिचें गुज ओठावरती अस्फुट कुजबुजलें !

केशकलापांतून काजळी थरथरली वीज
उशीवरोनी उठून गेली कुठें तरी नीज

लहरुं लागलें मुद्रेवरती तुझ्या भावगीत
असंख्य वीणा छेडुं लागली सभोंवती रात !

त्याच उशीवर आज अन्य हा केशबन्ध लोळे
तशीच मोहक कुजबुज तसले उन्मादक डोळे,

विलग पाकळ्या तशाच ढळती दर्वळती शेज
परन्तु कांहीं अबोध खुपतें उरामधें आज !

१९४३

# उषाच गमली

तांबुस गोरा कोमल बांधा
पुष्प काय उमलें कमलाचें
स्नेहशील ते नितळ नेत्र कीं —
थेंब दलावर दोन दंवाचे !
उभी अचानक राहसि दारीं
उषाच गमली ये क्षितिजावर
हो तिमिरांतुनि जागृत, भरलें
आरुण किरणांनीं मम अंतर !
स्फटिकाचा कीं स्तंभ लकाके
संधिकालच्या प्रकाशजालीं
शुभ्र जलावर पुष्करिणीच्या
तरंगते उज्ज्वल दीपाली !
येउनि पुढती बसुनी घडिभर
गेलिस करुनी मंजुळ कूजन
आठवणीनें त्या हो अजुनी
विचलित हें तिमिरांकित जीवन !

१९४५

# इतरांहुनि तव

इतरांहुनि तव प्रीति निराळी
आणि तुझी रीती
रम्यपणाला तुझ्या न विळखा
घालितसे नीती !
शत शतकांच्या संस्कारांचे
शाप तुला नाहीं
दूर तुझ्यापासून येथली
कृत्रिमता राही
जाणिव अमुची कैद जाहली
अमित शृंखलांत
वेढुनि बसते इथें प्रकाशा
कायमची रात !

तुला न पण तें बंधन गांजी
मुक्त फुले जीव
हार्दिकतेच्या अधिराज्याला
तिथें नसे शीव
गर्द सावली आम्रवनांतिल
अपरेचा वारा
चंद्ररसाच्या शरदामधल्या
ओहळत्या धारा
उदारता निरभिलाष बरसत
मेघांची राही
निसर्गतेचा त्याच जाहला
उमल तुझ्या ठायीं

# मी काय तुला वाहूं ?

मी काय तुला वाहूं—तुझेंच अवघें जीवितवैभव
काय तुला देऊं ?
नक्षत्रांच्या रत्नज्योती
तुझिया ओटीवर झळझळती
दीप रवींचे घरिं, तुजपुढती—
वात कशी लावूं ?

सागर सारे तव बागेंतिल
तृणपर्णावर जमलेलें जल
दंवबिंदूंचें, शिंपुनि ओंजळ
घालुं तुला न्हाऊं !

चतुर फुलारी वसन्त फुलवित
तुजसाठीं सुमसंचय अगणित
कशी लाजरी अर्धसुगन्धित
कळी करीं घेऊं ?

झुलती तव सदनाच्या द्वारीं
सांज उषेचे पट जरतारी
विणतो विधु अम्बर चन्देरी
वसन कुठें पाहूं ?

अलंकार तुज शोधूं कोठुन ?
शुक्र तुझ्या कंठांतिल भूषण
इंद्रधनूचें सुरम्य कंकण
शृंगारित बाहू !

एकच आहे माझी दौलत
नयनीं जो हा अश्रु तरंगत
मानवतेचें ज्यांत मनोमत
तोच पदीं वाहूं ?

१९४५

# नवें–जुनें

" नवीन कांहीं गा हो आतां
जुनें-जुन्याचें चर्वण सरुं द्या
प्रतिभेचीं पाखरें आपुल्या
नव्या नभामधुनी भिरभिरुं द्या !

तीं कमलें तीं, त्याच चांदण्या
तेंच चांदणें, तोच सुधाकर
प्रेम तेंच तें, त्या नवयुवती
तीं कुसुमें अन् तो कुसुमाकर !

युगायुगांतुन घासत घोटत
टाकारित आकारित बसली
कविकलमांची अफाट सेना
काव्यमूर्ति त्या जीर्णामधली !"

प्रिय रसिका, हें खरें तुझें वच
मीहि असें जीर्णाचा वैरी

परि कालाच्या अतीत आहे
अनाद्यन्त ही दौलत सारी !

प्रमदेच्या मधु अधरावरचें
ललित लालसर तें आमंत्रण,
चंद्र पुनेचा धरतीभंवती
करितो जी स्वप्नांची गुंफण,

वैशाखांतिल पहाटवेळीं
कूजन जें तिमिरांतुन वाहे,
सुगंध–सुंदरता सुमनांतिल
अथांगता जी गगनीं आहे;

सौंदर्यें हीं होतिल जेव्हां
नीरस आणि असुंदर सखया,
त्याच क्षणीं या संसारांतिल
कविता अवघी जाइल विलया !

१९४८

# जीर्ण देवळापुढें

उदास अंधारांत एकली
ज़ळत असे ज्योती
जीर्ण देवळापुढें नदीवर
या पारावरती.
घिरट्या घाली अवखळ वारा
बावरुनी जाय
फडफडवी चिमुकलें पांखरूं
सोनेरी काय !
भयकर एकान्तांत देत ना
साद तिला कोणी
ऐकत राही, तळीं चिऱ्यांशीं
कुजबुजतें पाणी.
शिशाप्रमाणें दाटुन पडली
सभोंवती रात्र

डोहावरती बिंबशलाका
थरथरती मात्र.
अबल अन्तरांतील रोधुनी
भीती आशंका
उधळित राही काळोखावर
तेजाच्या कणिका
तेज तेंहि पण अंधुक अपुरें
इवलीशी वात
उघडुनि जबडा प्रकाश गिळते
भयाण ती रात !
तशीच तडफड करीत राही
तेवत ती ज्योती
उजळ पायऱ्या करी, जरी ना
मंदिर वा मूर्ती !

# उणीव

हो श्वान गादीवर बैसलें हें
शोभे शिराला पगडी तुऱ्याची
पायांत चारी वलयें रुपेरी
कंठांत माळा झळके हिऱ्याची !

वेषांतही न्यून उरें न कांहीं
अंगांत बंदी नि तुमान लाल
मुद्रेवरी राजविभाव दावी
तो बैठकीचा भलताच डौल !

भुंके दिमाखांत, कशी टळावी
उच्चासनाची पहिली उपाधी
विस्तारुनी नाक मिटून डोळे
लावून केव्हां बसतो समाधी !

हा हन्त ही एक परी उणीव
वेषांत सामावत पुच्छ ना तें
दावी पुढें कौतुक बादशाही
मागें परी हालत तें रहातें !

# प्रीत पतंगाची

काळोखांतुन पतंग कोणी
येउन ज्योतीवर धडपडतो
अभेद्य अविचल अजिंक्य हो ती
परी इरेला पडलेला तो !

या कोनांतुन त्या कोनांतुन
चेवुन धावे झेपा घाली
धडका मारुन भिंगावरती
व्यर्थ जिवाची करी कहाली !

काचेंतिल तेजाळ परी ती
क्षुद्र किडा हा दलदलींतला
मीलन कुठलें ? अखेर खालीं
पंख तुटोनी मरून पडला !

जाळित ती निज जीवन बसली
तेजोरेषा फुलवित तिमिरीं
सुवर्णकांती पाहुन मोहुन
गवतांतुन आली ही स्वारी !

'प्रीत पतंगाची '—मी ऐकत
निरर्थ तडफड पण बघतां ती
गमे तयाच्या मूर्खपणाला
नसे तुलाही मानवजगतीं !

— १९४८

# मातीचें घर

मातीचें पण तुझेंच हें घर
कर तेजोमय बलमय सुंदर !

आजवरी हें गमलें माझें
अन्ध अहंता हृदयीं गाजे
राखित बसलों मी दरवाजे
अशरणतेचे घालुनि अडसर !

कळलें आतां परी मनोमन
दारावर मी केवळ परिजन
चैतन्याचें घरांतलें धन
तुझ्या द्युतीचा मात्र असे कर !

तेज भरे जें ग्रहनक्षत्रीं
प्रकाशतें जें दिवसारात्रीं
जीवनमय जें करी धरित्री
कण त्याचा मम उजळी अंतर !

फुलांत उमलत घनांत गर्जत
नदींत वाहत वायुंत विहरत
तेंच तुझेंपण होय इथें स्थित
नच घर माझें तव हें मंदिर !

जरी भव्यता वैभव नोहे
आंत तुझें सिंहासन राहे
ये क्षणभर ये म्हण माझें हें
फुलवी गीतें सुनेपणावर !

तिमिरानें भरल्या एकान्तीं
लावी पळभर मंगल ज्योती
प्रदीप्त होउन धरतिल भिंती
छाया तव हृदयीं जीवनभर !

१९४६

# येशिल का आज दुपारीं

भर दिवसां माझ्या द्वारीं
येशिल का आज दुपारीं ?
तिमिराचा तूं सांगाती
तिमिरांकित होतां धरती
तिमिरांतुन नाहत रातीं
तिमिरासह येसि समोरी !
येशिल का आज दुपारीं ?

तट शिसवी काळोखाचे
राहतां उभे रात्रीचे
दापीत नाद चरणाचे
सरपटसी त्या अंधारीं !
येशिल का आज दुपारीं ?

पसरतो सुन्या मार्गांत
अजगरापरी एकान्त
लाजून सांदिकोनांत
सावल्या फिरत संसारीं !
येशिल का आज दुपारीं ?

वस्त्रांतुनि निथळत पडती
तमिराचे थेंब सभोंती
शरमेंत कोंदली प्रीती
शंकेंत भावना सारी !
येशिल का आज दुपारीं ?

रे तूं न तुझी पण छाया
थरकांपत ये दारीं या
भाविकता जाउन विलया
भीतींची हो रहदारी ?
येशिल का आज दुपारीं ?

तिमिरांतिल आराबन हें
प्रियकरा, न आतां साहे
सांकळून जीवन राहे
साचतसे डोह विखारी !
येशिल का आज दुपारीं !

१९४९

# दूर निनादे

दूर निनादे स्वरसंमेलन !

घनांतुनी कर सुवर्ण झरती
उषःकालचे, उजळत धरती
तसे माझिया भंवती फिरती
रव हृदयंगम एकान्तांतुन !

कुठुनि येत या मंजुळ लहरी
घुमवित पैंजणनाद रुपेरी
न कळे मजला किमया सारी
कोण करी अज्ञातीं राहुन !

गुरफटतां ते ध्वनिचे धागे
विरावया पार्थिवता लागे
केवळ मीपण राहुनि जागें
जलवलयांपरि पसरे जीवन !

अज्ञातामधुनी अज्ञातीं
वाटचाल करतां दिनरातीं
गीतच व्हावें हें सांगाती
त्यांतच गवसावें जीवितधन !

१९४७

# एकाकी हा जागे

एकांतांत जळे एकला हा दिवा
डोहापरी खिन्न साचलेली हवा
एकाकी हा जागे जळे येथ, दूर
अनंतांत जमे तारकांचा थवा !

अनाद ही वेळा, जाती शरमून
अपराध्यापरी काजळले क्षण
शूलासम उभा लोहस्तंभ, वरी
पेरीत हा राही प्रकाशाचे कण !

रस्ता पडे शांत अजगरापरी
लोपलेली सारी आतां रहदारी
वाटसरू कोणी चुकला वा श्रांत
जातां, त्याची वाट प्रकाशित करी !

कर्मयोगी, आशा फलाची ना त्यास
नसो नेता किंवा सखा सोबतीस
अंतरींचें तेज उपसावें द्यावें
उजाडे तों पथा, हीच एक आस !

१९४७

# समाधान

क्रोधानें केधवा
हेलावतां मन
यांतच सांत्वन
लाभो मज :

खुजांचा मेळावा
मूर्खांची मिरास
अभिधान यास
जगत हें !

ऐशांच्या सांगातीं
व्हावें विनोदन
कासया दहन
अंतराचें ?

वारुळाशीं उभे
राहूनी बघावे
कीटकांचे थवे
लीला त्यांच्या

अफाट विस्तार
अहंतेचा होतां

सर्वत्र क्षुद्रता
( खरीखोटी ! )

धूराचा विशाल
स्तंभ उंचावत
होई गगनांत
मेघरूप !

माझ्या आत्मतेची
कणिका ही तैशी
वाढत तत्त्वाशीं
एक व्हावी

माझ्यांतच राहे
विश्वाची राणीव
होतां ही जाणीव
काय केवा ?

बाहुल्यांच्या जगीं
जातां गलीव्हर
केवळ ये भर
विनोदासी !

१९४८

# पाउलचिन्हें

मीं एक रात्रि त्या नक्षत्रांना पुसलें
परमेश्वर नाहीं घोकत मन मम बसलें
परि तुम्ही चिरंतन विश्वांतील प्रवासी
का चरण केधवा तुम्हांस त्याचे दिसले ?

तो आहे नाहीं कुणां न लागे ठाव
प्रज्ञेची पडते तिथें पांगळी धांव
गवसे न किनारा, फिरे जरी दर्यांत
शत शतकांमधुनी शिडें उभारुन नाव !

स्मित करुन म्हणाल्या मला चांदण्या कांही,
तो मुक्त प्रवासी फिरत सदोदित राही
उठतात तमावर त्याचीं पाउलचिन्हें–
त्यांनाच पुससि तूं, आहे कीं तो नाहीं !

१९४९

# सुदामा

हिमाचलाच्या धवलगिरीवर फुलुनि उष:काल
तळपत हिमराशींत पडावें किरणांचें जाल

होउनि वा उद्रेक सागरीं धुक्यापरी फेंस
पसरावा वर झळकत यावी रत्नांची रास—

असेंच घडलें दर्शन मजला तुझ्या मंदिराचें
हृदय धावलें नयनीं बघण्या वैभव मित्राचें !

स्फटिकाच्या स्तंभांच्या रांगा उंच सभोंवार
नवरत्नांचे विलसत होते त्यांत अलंकार

धवल केशरी निळ्या प्रभेचे जरतारी झोत
उसळत होते, मिसळत होते तुझ्या महालांत !

प्रकाशपुष्पांच्या त्या मंडपिं तुझें भव्य तख्त
त्यावरती तूं कांचनदीपामधें जशी ज्योत

तुझें यशोधन पाहुन माझें थरारलें ऊर
भांबावुन देहलींत दारीं स्थिरावलों दूर !

बिलगे ज्यावर दूरदेशची धूळ हीनदीन
त्या चरणानें मळवुं काय या स्वर्गाची शान !

तोंच तुझ्या वदनावर फुलले स्नेहाचे भाव
उठसी घेसी धाव मिळाले कवेमध्यें जीव !

काजळलेल्या पोह्यांची मीं उलगडली गांठ
सेवन करितां तव नेत्रांचे ओलवले कांठ

दोन जगांचें मीलन झालें तें सीमेवरती
कशास टाकूं चरण पुढें मग मी दुसऱ्या जगतीं !

नको तुझें धनवैभव मजला नको राजधाम
प्रिय आहे माझा मज मित्रा, जीवनसंग्राम

वळलों मी माघारीं आतां घराकडे जात
नेतों एकच तव अश्रूंची स्मृती अंतरांत !

१९४३

# सूर्यफूल

पांखडसी सूर्यास्तव
सूर्यफुला, व्यर्थ जिवा
निर्दय त्या अग्नीला
भक्तीचा नच केवा
वेड्यापरि अनुसरसी
दिनभर त्या तेजासी
दिसशिलही त्यास न तूं
देखत जो सर्वांना !

—उत्तरलें तें मजला
" आत्मार्पण अंध असे
अणुरेणुंत देहाच्या
केवळ भक्ती विलसे
सुफलित हो वा नच हो
पूजन नच खंडित हो
भक्तिस आरंभ असे
नाहिं परी अस्त तिला !

तेजोनिधि येतां तो
तळपत उदयाद्रिवरी
अग्निकिरण अगणित या
धगधगती देहभरती
भूवर मी तो व्योमीं
तो अपार पामर मी
सर्वंकष दृष्टिस त्या
दिसणारहि मी नाहीं !

दिसणारहि मी नाहीं
कळणार न पूजा ही
ओलांडुन जाइल तो
कनकरथांतून मही !
किरणांना मावळत्या
अभिवादन करुनी त्या
जाइन मातिंत मिळुनी
त्यांतच मज मोक्ष असे !

# एकदा ऐकलें

एकदा ऐकलें
कांहींसें असें :
असीम अनंत
विश्वाचें रण
त्यांत हा पृथ्वीचा
इवला कण
त्यांतला आशिया
भारत त्यांत
छोटयाशा शहरीं
छोटया घरांत—
घेऊन आडोसा
कोणी 'मी' वसे
क्षुद्रता अहो ही
अफाट असे !
भिंतीच्या त्रिकोनीं
जळमट जाळीं
बांधून राहती
कीटक कोळी
तैशीच सारी ही
संसाररीती

आणिक तरीही
अहंता किती ?...
परंतु वाटलें
खरें का सारें ?
क्षुद्र या देहांत
जाणीव आहे
जिच्यांत जगाची
राणीव राहे !
काचेच्या गोलांत
बारीक तारा
ओतती रात्रींत
प्रकाशधारा
तशीच माझ्या या
दिव्याची वात
पाहते दूरच्या
अपारतेंत !
अथवा नुरलें
वेगळेंपण
अनंत कांहीं जें
त्याचाच कण !

डोंगरदऱ्यांत
वाऱ्याचीं गाणीं
आकाशगंगेंत
ताऱ्यांचें पाणी
वसंतवैभव
उदार वर्षा
लतांचा फुलोरा
केशरी उषा...
प्रेरणा यांतून
सृष्टींत स्फुरे
जीवनतेज जें
अंतरीं झरे
त्याचेंच माझिया
करीं हो दान
गणावें कसें हें
क्षुद्र वा सान?

१९४९

# अज्ञात

असशी सतत मला अज्ञात्
कणाकणांतुन तव कानोसा घेतों जरि जगतांत्
नदीकिनारीं अमल जलांतुन
गमतें पळभर हो तव दर्शन
तोंच पडोनी पर्ण लोपते प्रतिमा जलवलयांत्
असशी सतत मला अज्ञात् !

गिरीदरीची गहन भव्यता
चरणखुणा तव त्यांत शोधतां
लोहमार्ग त्यांतून धडाडत धूर भरे गगनांत्
असशी सतत मला अज्ञात् !

श्यामनील सागरलाटेवर
क्षणभर भासे मूर्ति मनोहर
पिसून पडती तुषार अगणित भास विरे दरियांत्
असशी सतत मला अज्ञात् !

अथांग नीलामधून वरती
तुझ्या स्मिताचीं कमलें फुलतीं
कृष्ण घनांचे ग्रासति कुंजर तोंच तयां निमिषांत्
असती सतत मला अज्ञात् !

अस्तित्वाचें तव मृगजल हें
अशेष विश्वा व्यापुनि राहे
आर्त धावती भाविक मृग हे तयाकडे दिनरात्
असती सतत मला अज्ञात् !

जीवनजल तव चरणावरती
अभिषेकाया अधीर भक्ती
जळुनि जात रे क्षणाक्षणानें हृदयाची फुलवात्
असती सतत मला अज्ञात् !

१९४४

# निळें चक्र हें

ध्वज अमरण हा
ध्वज अशरण हा
ध्वज अविरत हा फडकेल !
वीरांच्या रुधिरांत भिजे हा
संतांच्या श्रद्धेंत रुजे हा
त्रिवर्ण हा निर्भय नीलांतुन
जीवन नव वरसेल !
ध्वज अमरण हा०
धवल हिमाचल घाली पांखर
अर्घ्य देतसे विशाल सागर
उदयगिरीवर पूर्वेच्या हा
सवित्यापरि तळपेल !
ध्वज अमरण हा०

धरतीच्या जखमी हृदयांतिल
सुफलित स्वप्नें इथेंच होतिल
रक्षित मानव्याची दौलत
जागवुनी जागेल !
ध्वज अमरण हा०
दुर्बल दलितांचें हा रक्षण
मिरविल समतेचें राणेंपण
अमानवांचें अंध महाबल
यावरती तडकेल !
ध्वज अमरण हा०
नक्षत्रांच्या दिव्य पथांतुन
इंद्रधनुष्यांच्या वेशींतुन
निळें चक्र हें जाइल, जेथें
जगत नवें उमलेल !
ध्वज अमरण हा, ध्वज अशरण हा
ध्वज अविरत हा फडकेल !

१९४७

# ती संध्याकाळ

रविभवती फिरतां मंडल विश्वांतुनी
निमिषार्ध राहिली थबकुनिया मेदिनी
ओघळला अश्रू, काहुरलें अन्तर
तेजांत नाहतां तम येई दाटुनी !

यमुनेच्या काठीं धडधडतां ती चिता
सहधर्मी चंदन आवेगुनि पेटतां
सैतान हांसुनी विकट गर्जना करी
ध्वज चढवा माझे जगतावरती अतां !

ती नाव चंदनी चाले स्वर्गाकडे
फडफडत केशरी ज्वालांचीं वर शिडें
घेऊन जगांतिल साधुत्वाचें धन;
हें विशाल मंदिर मात्र रिकामें पडे !

१९४८

# माझा हिंदुस्थान

माझा हिंदुस्थान्
माझा माझा हिंदुस्थान् !
हिमाचलाचें हीरकमंडित शिरभूषण भरदार्
वक्षावर गंगायमुनांचे रुळती मौक्तिकहार्
कटीस तळपे मराठमोळचा गोदेची तरवार्
महोदधीचें चरणाजवळीं गर्जतसें आव्हान्
माझा हिंदुस्थान् !
इतिहासाच्या क्षितिजावरती उजळे वेदमशाल्
वागीश्वरिचें विहारमंदिर देखा येथ विशाल्
काल-सरोवरिं फुललें सुंदर सरोज ताजमहाल्
कैलासाच्या भव्य कलेचें आम्हांला वरदान्
माझा हिंदुस्थान् !

पेटविले पाषाण पठारावरती शिवबांनीं
गळ्यामधें गरिबांच्या गाजे संतांची वाणी
ज्योतीसम समरांत जळाली झांशीची राणी
त्या संतांचें, त्या वीरांचें प्रियतम तीर्थस्थान्
माझा हिंदुस्थान् !
रात सरे, ये प्राचीवरती तेजाची रेषा
नव्या मनूचा घोष घुमे हा दुमदुमतात दिशा
जागृत झाल्या दलित जगाच्या बलशाली आशा
स्वातंत्र्याचें, समसत्तेचें उन्नत होय निशाण्
माझा हिंदुस्थान् !

# निरोप

[ उत्तर देशांतून निर्वासितांना हालवीत असतां, एका स्त्रीनें आपले मूल विमानांत ढकलून दिल्याचें वृत्त प्रसिद्ध झालें होतें. ]

गर्दींत बाणासम ती घुसोनी
चाले, उरें ना लव देहभान
दोन्ही करांनीं कवटाळुनीया
वक्षःस्थळीं बालक तें लहान !

त्या गौर गालांवर रक्तरेषा
हेलावती कुंतल शुष्क भाळीं
विच्छिन्न वस्त्रांतुनि यौवनाची
ओसंडते मुक्तपणें नव्हाळी

लज्जा न संकोच नसे न भीती
हो दग्ध तें स्त्रीपण संगरांत
आतां उरें जीवनसूत्र एक
गुंतून राहे मन मात्र त्यांत !

बाजार जेथें जमला बळींचा
तेथेंहि जागा धनिकास आधीं

आधार अश्रूंसहि दौलतीचा
दारिद्र्यच दुःखा दुसरी उपाधी !

चिंध्या शरीरावर सावरोनी
राहे जमावांत जरा उभी ती
कोणीं पहावें अथवा पुसावें
एकाच शापांतुनि सर्व जाती !

निर्धार केला कसला मनाशीं
झेंपावुनी ये ठिणगीप्रमाणें
फेकूनिया बाळ दिलें विमानीं
व्हावें पुढें काय–प्रभूच जाणे !

झाला इशारा, जन दूर झाले
आवेगुनी क्रंदत तें विमान
अश्रू उसासे ध्वनि हुंदके ते !
वेगांत गेलें गगनांत यान !

जा पांखरा, जा वणव्यांतुनी या
पृथ्वीच आई पुढती तुझी रे
आकाश घेईल तुला कवेंत
चारी दिशांचा तुज आसरा रे !

ठावें न कोठें मज, काय झालें
गेलें जळोनी मन मानवांचें
मांगल्य सारें पडलें धुळींत
चोंहीकडे नर्तन हिंस्रतेचें !

जें जें गमे सुंदर जीवनांत
त्यांच्या शवांचा खच हो धरेला
जो धर्म व्हावा सकलां प्रकाश
त्यांतून अंधार भयाण आला !

झाले रिकामे करपाश आतां
शून्यांत सारेंच मिळून जाई
संबंध संपे—म्हणशील केव्हां
होती मलाही कुणि एक आई !

कांहीं असे बोल—कुणास ठावें—
आले न आले तिचिया मनांत
पाही परंतू नभि जेधवा ती
आनंद नेत्रांमधल्या जलांत !

# आवाहन

नाचत गर्जत विश्व घुमाळत येइ महाकाली
संहाराची सुवर्णघटका आली गे आली !

दुमदुमत भयानक रणभेरी नौबती
ज्वालांच्या जिव्हा गगनाला ग्रासती
रुधिराच्या धारा धरतीवर वाहती
वेताळांचीं कुळें अणूच्या कुशींतुनी उठलीं
संहाराची सुवर्णघटका आली गे आली !

हें विशाल आशामय जीवनमन्दिर
कोसळून जळतें, धगधगलें अम्बर
किंचाळत खचती स्तंभ चिरे भूवर
शतकांच्या स्वप्नांचीं शकलें धुळीमधें पडलीं
संहाराची सुवर्णघटका आली गे आली !

तडितांचे बांधुन पायामधिं पैंजण
उधळीत भोंवती नक्षत्रांचे कण
मेघांचे घुमवित मृदुंग रणभीषण
मदान्ध सामर्थ्यें तुडवित ये निज चरणाखालीं
संहाराची सुवर्णघटका आली गे आली !

सळसळत शृंखला धुन्द नागिणीपरी
आवळी पाश पददलित मानवावरी
तो गुलाम जखमी तुज आवाहन करी
रक्ताश्रूंचीं फुलें पूजनास्तव तव हीं फुललीं
संहाराची सुवर्णघटका आली गे आली !

हे लोकदेवते क्रुद्ध तुझ्या नर्तनें
डळमळो पृथ्वीचा तोल नभीं भीतिनें
राखेंत लोळुंदे किरीट–सिंहासनें
शापमुक्त त्या भूवर कर मानवता बलशाली
संहाराची सुवर्णघटका आली गे आली !

१९४६

# फेरीवाला

आला हा ललकारित आला
आला फेरीवाला
दुनियेच्या पेठेंत पुकारित
बहुविध मालमसाला !
आला आला फेरीवाला !

वेष यतीचा अंगावरती
मुद्रेवरती अथांग प्रीती
नयनांमधली उदारता ती
अशेष जगता दे आमंत्रण—
या संकोच कशाला ?
आला आला फेरीवाला !

वामनगतिनें हा सौदागर
वाट चालतो अधीर आतुर
या देशांतुन त्या देशावर
टाकित पाउल अपक्षतेनें
संधी दे सकलांला
आला आला फेरीवाला !

करी पुकारा दारीं थांबुन :
या सुजनांनो, सोन्याचा दिन
अमोल माझा माल, नको धन
रक्तमांस हें स्वस्त चाललें
खुशाल या लुटण्याला !
आला आला फेरीवाला !

हा घट देखा, यांतिल शोणित
मेलें तरि अद्याप उधाणत
उमद्या युवकांचें हो जीवित
रणांगणावर पिळून त्याचा
घट ताजा हा भरला !
आला आला फेरीवाला !

कुपींत या भरलें जल कोमल
अगणित अबलांच्या नेत्रांतिल
मौज बघा, द्या नुसती चाहुल
थरथरती हे थेंब भयानें
स्वभाव अजुनी उरला !
आला आला फेरीवाला !

मंजुषेंत या राख मनोहर
उदात्त सोज्ज्वळ नैतिक नागर !
आग बरसतां सुखी घरांवर
मिठ्या मारुनी गळ्यांत जळले
त्यांचा मिश्रित काला
आला आला फेरीवाला !

सहज बोट राखेंतुन सारा
गृहसौख्याचा गोड उबारा
गुंतुन राहे आंत बिचारा !
अदग्ध आशांचे काळे कण
लागति अजुनि कराला !
आला आला फेरीवाला !

जुनवट अथवा प्रौढ नको का ?
ही घ्या दुसरी संदुक देखा,
बाळजिवांच्या ललाटरेखा
फुलण्यापूर्वी फुटलेल्या, हा—
मिळतो माल कुणाला ?
आला आला फेरीवाला !

ही बरणी ? हिजमधें संस्कृती
मुरलेली शतकाशतकांतीं
कांहींही घ्या, तयासंगती
पसा भरुन घ्या मोफत, असली
कुठें किफायत बोला ?
आला आला फेरीवाला !

दुनियेच्या पेठेंत पुकारित
अपुला मालमसाला !
आला आला फेरीवाला !

१९४८

# अजिंक्य निर्धार

आहे अजिंक्य हा निर्धार् !
क्रूर काजळी चिरेबन्द तट सभोंवतीं बांधा
नाहीं बद्ध कधीं होणार्
प्रहार यावर समशेरींचे पदोपदीं घाला
नाहीं विद्ध तरी होणार्
परजा साखळदंड उभारा सूळ संगिनींचे
घ्याया निर्दय बलिदान
जखमांवरचें रक्त पुसोनी गर्जत राहिल हा
रणाचें सूडाचें गान
खवळून येउं द्या मदान्ध सिंहासन
नरसंहारक गण दैत्यांचे घेउन
तें पडेल येथें कांचेपरि भंगुन
भस्म तृणाच्या भाऱ्यापरि हो शस्त्रांचा संभार्
आहे अजिंक्य हानिर्धार् !

कोटयवधी मानवहृदयांतिल ही महदाकांक्षा
तिजला ना तट ना भिंती
शतवर्षांच्या दलित दीप्तिचा दावानल पेटे
जाइल पेटत हा पुढती
पायदळीं तुडवा पावित्र्यें रचा हुतात्म्यांचीं
सरणें असुरांनो आज
अमर विहंगा परी आपुल्या चितेमधूनी हा
घेई टिपूनिया तेज
ना पराजयानें पराभूत होतसे
हा मृत्युंजय, ना मरणानें मरतसे
विजयाची एकच अखेर त्याला असे
स्वातंत्र्याचा ध्वज या गगनीं गर्वानें चढणार्
आहे अजिक्य हा निर्धार्

१९४५

# कायदा

हा कायदा !
लक्षावधी हृदयांतुनी
जें स्वप्न उज्ज्वल रंगलें
तें आजला आकारतां
रक्तासवीं हो नाहलें !

बलिदान जें वेदीवरी
ज्वालांत संतत जाहलें
साधुत्व जें सौजन्य जें
त्या प्रेषितासह पूजिलें—
त्याचाच अंतिम फायदा !
हा कायदा !

मातीमधें काष्ठापरी
पडली पहा अबला कुणी
निष्प्राण झाले नेत्र ते
ओली अजूनी पापणी !

ये पोट घेउनि ही इथें
तें सत्य एकच माहिती
जे भुक्त त्यांची राहते
पोटांत सारी संस्कृती !

घे संगतीं निज अर्भका
—पडलें कुठें केरापरी—
संग्राम वा सत्ता नको
होती हवी हो भाकरी !

उदयास ये पण भाग्यता
संसार येथें संपला
चरितार्थचिंता ना जिथें
तो स्वर्ग सुंदर लाभला !

धरणी परी शोकार्त ही
कवळून बैसे प्रेत तें
जड आंसवांतुनि कांपऱ्या
त्या लक्तरां न्याहाळते !

धारा दुधाच्या वाहणें
स्नेहार्त ज्या वक्षांतुनी
उपसून रक्तच काढलें
त्यांतून मारुन संगिनी !

आश्वासनें आशा न वा
ना दीप कोणीं दाविला
तिमिरांतली पथचाल ती
तिमिरांत शेवट जाहला !

बघतां मृतांतिल जागृती
त्या क्रुद्ध झाल्या बंदुका
लोहांतुनी मृत्यू सुटे
विझवीत जीवनदीपिका !

नाहीं निराशा, यांतही
येत्या सुखाचा वायदा
ऐसेल कांहीं, तोंवरी
हा धन्य मानूं कायदा !
हा कायदा !

१९४९

# जय भारता

जय भारता ! जय भारता !
जय भारती जनदेवता !

जय लोकनायक थोर ते
जय क्रांतिकारक वीर ते
जय भक्त ते, रणधीर ते
जय आमुची स्वाधीनता
जय भारता ! जय भारता !

तेजोनिधी हे भास्करा,
प्रिय पर्वता, प्रिय सागरा,
तरुवृंदहो, हे अंबरा,
परते पहा परतंत्रता !
जय भारता ! जय भारता !

बलिदान जें रणिं जाहलें
यज्ञांत जें धन अर्पिलें
शतकांत जें हृदयीं फुले
उदयाचलीं हो साङ्गता !
जय भारता ! जय भारता !

ध्वज नीलमंडल हो उभा
गतकाल हा वितरी प्रभा
भवितव्य हें उजळी नभा
दलितांस हा नित तारता !
जय भारता ! जय भारता !

१९४७

# एकच गाणें

एक भुकेचें गाणें
भरलें एक भुकेचें गाणें
मंजुळ नादामधें निनादत
बाकी व्यर्थ तराणे !

खळखळ मोटेची शेतावर
गिरणींतिल चक्रांची घरघर
गजबज रस्त्यामधील नागर
एक समेवर सगळ्या ताना
पुन्हां समेवर येणें !– भरलें०

प्रसन्नशा पुनवेच्या वेळीं
गुंफित मधु शब्दांचीं जाळीं
प्रियेस प्रियकर कवेंत कवळी
उदात्त भावात्मक प्रेमाचे
सांगत गोड बहाणे !–भरलें०

अनाम कोणी शूर शिपाई
शरीर समरीं पिंजुन घेई
इतर मारती घरीं बढाई
कवनांतुन हो आच्छादित जी
उदरीं आग उधाणे !–भरलें०

शिल्पकार हा विकतो मूर्ती
माध्यान्हाची करण्या पूर्ती
करी पुजारी धूप आरती
देवधनावर जडवुनि आशा
रक्षी जीर्ण पुराणें !–भरलें०

पारध करण्या मानव पहिला
गुहेंतुनी बाहेरीं पडला
गवसे ना जें हवें तयाला
अजुनि पथावर असें प्रवासी
प्रवास कधि का सरणें !–भरलें०

१९४८

# वेगवती

कवटाळुनि उरिं सहस्र मानव
पीत विजेचा रस तारांतुन
तुडवी पोलादी पथ चरणीं
देहाचें अवघ्या रणगायन !

धावत हा उन्माद उधाणुन
मूर्तिमंत गति गर्वित गर्जत
पहाड पर्वत दरी महानद
ओलांडित, हो कुठें न कुंठित !

क्रुद्ध काय हें तुफान धावत
मदांध जलधीच्या लाटांवर,
तडितेचा कडकडतो आसुड
दुभंगुनी तिमिरांकित अंबर !

पददलितांचा दुर्दम संगर
दासांचें कीं बंधविमोचन
धिक्कारुनिया सूळशृंखला
उद्घोषत घे धाव तमांतुन !

दूर तळीं लोहस्तंभावर
आरुण कमलापरि अंधारीं
ज्योत तांबडी फुलेल तेथें
विसावेल हा वेग अखेरीं !

# माता

माता उदासीन झाली !
हिमालयाच्या शुभ्र शिलेवर शिर टेकुन पडली
माता उदासीन झाली !

कपोल आधारे बाहूवर
हृदयाशीं बिलगे दुसरा कर
मुक्त केश भारावुन पडले खांद्यावर खालीं !
माता उदासीन झाली !

झंझावात सरे अश्रूंचा
तळमळण्याचा, तडफडण्याचा
उरे पापण्यांवर ओलावा ओघळ अन् गालीं !
माता उदासीन झाली !

अर्धनग्न ती पडे कुशीवर
भूवर लोळे मलीन लक्तर
दिसे काळजाखालिल धूळित रक्ताची लाली !
माता उदासीन झाली !

संथ घनासम उदासता ही
वदनावर रेंगाळत राही
थकल्या डोळ्यांवरती ग्लानी विसावुनी बसली !
माता उदासीन झाली !

परि स्मिताची तरळे रेषा
सूचित करिते अजिंक्य आशा
बंदिघराच्या अंधारांतुन हांक काय आली !
माता उदासीन झाली !

१९४३

# एक स्वप्न

रक्ताच्या दर्यांत उदेला भव्य सुवर्ण मिनार !
झंझावात करी जलमंथन
उसळत लाटा लाल उधाणुन
माणिक रत्नांची आंदोलत पर्वतरास अपार !

मेघांचा वर दाट पसारा
वीज कडाडे सैरावैरा
लोहाच्या राशींतुन धावत रजतरसाची धार !

रक्ताचा तो अफाट सागर
खवळे आवेशांत अनावर
विराट जाळें गगनीं विणती त्याचे लाल तुषार !

आणिक झाली क्षणांत किमया
रुधिराचे थर जाती विलया
फुलले तेथें लाल गुलाबी सुमनांचे संभार !

वादळ सरलें, निवांत झालें
झांकळ अभ्रांचें ओसरलें
नीलाकाशीं करूं लागलें इंद्रधनुष्य विहार !

मखराखालीं त्या तेजोमय
दर्यामधुनी ये देवालय
कांचनगंगेपरि हें तळपत दीप्तीचें भांडार !

१९४३

# अनामिकास

अनाम वीरा जिथें जाहला तुझा जीवनान्त
स्तंभ तिथें ना कुणी बांधला, पेटली न वात !

धगधगतां समराच्या ज्वाला या देशाकाशीं
जळावयास्तव संसारांतुन उठोनिया जाशी !

मूकपणानें तमीं लोपती संध्येच्या रेषा —
मरणामध्यें विलीन होसी, ना भय ना आशा !

जनभक्तीचे तुझ्यावरी नच उधाणले भाव
रियासतीवर नसे नोंदलें कुणीं तुझें नांव !

जरी न गातिल भाट डफावर तुझें यशोगान
सफल जाहलें तुझेंच हें रे तुझेंच बलिदान !

काळोखांतुनि विजयाचा ये पहाटचा तारा
प्रणाम माझा पहिला तुजला मृत्युंजय वीरा !

 १९४७

# ध्वजधारी

जयोऽस्तु ते ! जयोऽस्तु ते !
जय जयोऽस्तु ते ध्वजधारी !

कणाकणांतुन जळे रणांगण
अवघ्या गगनाला ये आधण
अग्नीच्या त्या कल्लोळांतुन
नेसी ध्वज निर्धारीं !

कडकडती तडिता तव भंवतीं
त्या प्रलयांतुन संथ सरे ती
मेघापरि तव गभीर मूर्ती
उद्घोषत ललकारी !

पैलतटावर जडवुन लोचन !
काढसि वीरा पथ वणव्यांतुन
उधळित जाळित अपुलें जीवन
टाकसि चरण पुढारी !

धूलिधुराच्या ढगामधें ती
दृष्टिआड हो तुझी आकृति
परंतु झेंडा झळकत वरती
तव संदेश पुकारी !
जय जयोऽस्तु ते ध्वजधारी !

१९४३

# साक्षात् ईश्वर—

अंधारीं पहुडे हताश जखमी माता धरित्री तिच्या
नेत्रीं स्वप्न फुलें प्रकाशमय हें – हा हन्त तें संपलें
खालीं घालुन मान मूक बसली प्रत्यक्ष वागीश्वरी
तेथें गुंफुनि कोण क्षुद्र यमकें बांधील ही भावना !

तेजाचा तिमिरासवें उसळला संग्राम हा भीषण
रात्रींचा समुदाय धावत असे संहारण्याला उषा
मेघांचे फुटतात काजळ–कळे व्योमीं घुमे गर्जना
काळोखावरती प्रहार करती संतप्त सौदामिनी !

भांबावून विशाल चित्र बघतों, भूमीवरी मी उभा
झालेले विगतार्थ शब्द, उरले हे भाव शब्दाविना !
साक्षात् ईश्वर भूमिच्या लिहितसे हो भूर्जपत्रावरी
ओजस्वी युगकाव्य हें, बघुनिया संसार हो विस्मित

त्याचें रक्त धुळीमधें–' प्रभु लिही हीं अक्षरें शेवटीं
खालीं पूर्णविराम अंतिं गळला डोळ्यांतुनी अश्रुचा !

१९४८

# सुभाष

सुवर्णगरुडा, पसरुनि अपुल्या
पंखांच्या ज्वाला
रणघोषापरि भेदुनि जासी
मेघांच्या माला !
ही हताश माता हर्षाकुल अन्तरें
नजरेनें घेतां मागोवा, थरथरे
'हा आणिल का मज तेजाचे फुलवरे'
स्तिमित होउनी अवघा हा
संसार उभा राही
अनन्तांतली तुझी वीरता
वेडावुन पाही !

श्यामल अभ्रांच्या निकरांतुन
जिंकुनिया त्यांसी
निकषावरच्या कांचनरेषे-
परी पुढें जासी
आव्हान घेउनी उठलें नभ खवळुनी
मेघांच्या कुहरामधून सौदामिनी

हुंकारित येती, विद्ध जणू सिंहिणी
घुसळत दाही दिशा तमासह
ये झंझावात
तमा नसे पण तुला – उफाळे
गर्व तुझा त्यांत !

अधनेसाठीं अमरवनींचीं
फुलें खुडायास
हिरावलेली परत आणण्या
रत्नांची रास
एकाकी जासी झुंजत वैऱ्यांवर
घन रात्रित जैसा घुसतो अग्नीशर
तिमिरावर फुलवित तेजाचा मोहर
अमरत्वाच्या सारंगीवर
छेडुनिया तांत
काळ होउनी शाहिर गाइल
तव गौरवगीत

१९४६

# मेघांची सेना

चालली मेघांची सेना !
समरघोष गंभीर पुकारत निघे आत्मदाना
चालली मेघांची सेना !

सार्वभौम हा ग्रीष्म बलोद्धत
चराचराला सुटला जाळित
अग्निपाश करकचून करतो धरणीची दैना !
चालली मेघांची सेना !

शिलगावुनि शतलक्ष मशाली
उधळित भंवती, वरती, खालीं
उभारुनी कर करतो ताण्डव जगताच्या दहना !
चालली मेघांची सेना !

फळाफुलांचें आसव गिळुनी
ओढ्यामधले जलकण पिळुनी
करी नद्यांना नग्न ओढुनी जीवन–वसनांना !
चालली मेघांची सेना !

कडकडणारे आसुड साहत
लाल निखाऱ्यांवरती लोळत
आक्रंदुनि आवाहन करते भूमाता दीना !
चालली मेघांची सेना !

ते कानावर पुकार पडले
अफाट दर्यांतुन हे उठले
झुंज द्यावया धांवत सुटले, भूमि–परित्राणा !
चालली मेघांची सेना !

ओबड–धोबड, कुरूप, काळे
उरीं परंतू वीज पाजळे
करित घोष ही झुंड धावते नाचत बलिदाना !
चालली मेघांची सेना !

जिथें उभे, तेथें समरांगण
गर्जंत करती जीवन अर्पण
अहो दिव्य बेहोषपणा हा–अभिवादन त्यांना !
चालली मेघांची सेना !

पुढें हिंवाळा येइल शीतल
सुखमय सुन्दर होइल भूतल
निरभ्र गगनीं स्मरतिल का हे बंडखोर कोणां ?
चालली मेघांची सेना !

१९४३

# साफल्य

दर्यावर आंदोलत होत्या लालनिळ्या रेषा
क्षितिजावरती उगवत होत्या सोनेरी आशा
पश्चिमवारा फुलवित जीवन जगतावर आला
आज पहाटे त्या शूराचा पुतळा थरथरला !

अंधारांतुन गहन पूजिलें स्वप्न दिव्य एक
आयुष्याचा अखंड केला ज्यावर अभिषेक
साफल्याचा सुवर्णदिन तो उदयाचलिं आला
आज पहाटे त्या शूराचा पुतळा थरथरला !

पुलकित झाली अभिमानानें समरशील छाती
डोळ्यांमधल्या सजीव झाल्या हर्षानें ज्योती
पुन्हां एकदा महामंत्र तो ओठावर स्फुरला
आज पहाटे त्या शूराचा पुतळा थरथरला !

आणि उफाळे सीमेवरती तेजाचा पूर
प्रशांत दर्यावरती पसरे रत्नांचा चूर
अग्निफुलांच्या त्या शिल्पावर भुरभुरल्या माला
आज पहाटे त्या शूराचा पुतळा थरथरला !

# तेजाकडे

शापांतुनी हो मुक्तता !
करशृंखला खालीं पडे !
पांथा, तुझा शुभ मार्ग ह्या
तिमिरांतुनी तेजाकडे !

सीमेवरी मंदीर तें
दीप्तींत आरुण नाहतें
भवितव्यता सिंहासनीं
आरोहुनी तुज बाहते !

यज्ञामधें शतकांतुनी
बलिदान संतत जाहलें
ये देवता ज्वालांतुनी
तें श्रेय आतां लाभलें !

साथीस ये मार्गावरी
स्वातंत्र्य आतां संगतीं
सरला अभाव तमांतला
त्या जाणिवा आकारती !

तिमिरांतही आराध्य जें
होती चितारित कल्पना
आतां प्रकाशीं चालुं दे
त्याचीच केवळ साधना !

१९४९

## वैष्णव

वैष्णव मी कुसुमाहुन कोमल
वज्राहून बली
सांगाती अमरांचा, भीती
मरणाची नुरली !

नसे अहन्ता मजजवळी पण
असे अहंभाव
अशेष जीवित कवेंत त्याच्या
घेत असे ठाव !

बलहीनांचा नत पाइक मी
प्रबलांचा नेता
उन्मत्तांचा अजिक्य वैरी
दलितांचा त्राता.

आकाशापरि उदार माझी
गहन गाढ प्रीती
दास्य अनीती, सहानुभूती
हीच मला नीती.

देवळांत ना देवा माझ्या
घडे बंदिवास
चार दिशांच्या अमर मंदिरीं
पूजित मी त्यास !

अभिमानाची, स्वतंत्रतेची,
समतेची पूजा
प्रज्ञेची राणीव मानणें
हाच धर्म माझा.

जुमानितों ना जातिवर्ण मी
कर्मबंधनें वा
एक मानतों मी मानवता
योग तिची सेवा.

ग्रंथांच्या कबरींत न पडले
मृत माझे आधार्
वेद नवे नित गर्जत राही
मजभंवती संसार् !

# बलिदान

हें व्यर्थ न हो बलिदान् !

बलाढ्य बनतिल अपंग दुर्बल
मृत सामर्थ्यें सजीव होतिल
उठतिल हो क्रोधानें गर्जत शतकांचे नादान् !
हें व्यर्थ न हो बलिदान् !

बाळमुठी वळतिल बाजेवर
थरथरतिल अस्थींचे पंजर
धुळीमधोनी फुलतिल ज्वाला धगधगतिल पाषाण् !
हें व्यर्थ न हो बलिदान् !

घराघरांतुन पथापथावर
पवित्रतेचें पडे कलेवर
माणुसकीच्या मुडद्यावरती थयथयले हैवान् !
हें व्यर्थ न हो बलिदान् !

चितेवरी वीरांनो, अपुलीं
जरी शरीरें भस्म जाहलीं
झळकत येइल या अग्नींतुन समराचेंच निशाण् !
हें व्यर्थ न हो बलिदान् !

स्फुरेल यांतुनि घोष उद्यांचा
मायदेश हा जित्या जिवांचा
कोटयवधी प्रेतांचें नाहीं केवळ दहनस्थान् !
हें व्यर्थ न हो बलिदान् !

घेउनिया ही घोर कहाणी
अमित काळच्या जलधीवरुनी
जातिल या रक्ताच्या लाटा आक्रोशत रणगान् !
हें व्यर्थ न हो बलिदान् !

१९४३

# मातीचा पुत्र

स्वर्गामधल्या हे गर्वोद्धत देवदैवतांनो,
दयेचें आज नको दान
पृथ्वीवरचा मानव मी हा उभारुनी बाहू
देतसें तुम्हांस आव्हान !

युगायुगांचा प्रवास केला गहन तमांतुनि मी
साहुनी दास्य शिरावरती
जाचत होते, जखडत होते लोहबन्ध पायीं
परंतू मशाल ही हातीं !

या दीप्तीनें शिंपित शोधित अंधारीं वाटा
भरोनी तमामधें तेज
वेशीपुढती पाय रोवुनी स्वर्गाच्या देखा
ठाकलों उभा असे आज !

मनगटांत या आज उदेलीं अजिंक्य सामर्थ्यें
तुटोनी तळीं पडे लोह
देवांच्या दास्याची सरली आज काळरात
निमाले लज्जास्पद मोह !

मातीचा मी पुत्र पुकारी स्वर्गाच्या दारीं
माझ्या जातीची महती
हिरावलेली परत मागतों स्वतंत्रता माझी
प्रतिष्ठा माझी जी होती !

स्वर्गनदीच्या धवल जलावर अथवा अमरांचें
विलासी रक्त तरंगेल
रम्य आपुलीं मेघमंदिरें कडकडुनी खालीं
जळोनी अशेष होतील !

पडतिल मातीमधें रिकामे रत्नांचे पेले
चुरोनी किरीट असहाय
तुडवित जातिल चंदनचर्चित उरें कुबेरांचीं
पुढें हे चिखलाचे पाय !

मेघगर्जनेंतून दवंडी माझ्या मुक्तीची
झडूं द्या अवघ्या विश्वास
तडितेच्या अक्षरांत फिरवा नभामधें द्वाही :
न आम्ही देव, न हा दास !

●●●

देशमुख आणि कंपनीची

नवीं प्रकाशनें

१ जान्हवी

वि. वा. शिरवाडकर

२ प्रीतीचा शोध

वि. स. खांडेकर

३ जाई

विभावरी शिरूरकर

४ स्वप्नांतरिता

ग. त्र्यं. माडखोलकर